ॐ

रावसाहेब मल्लप्पा बसप्पा वारद ह्यांच्या उदार
आश्रयाखालीं प्रसिद्ध होणारी वीरशैव-
लिंगिब्राह्मणधर्मग्रंथमाला.

ग्रंथ ४१ वा.

श्रीमच्चन्नबसवेश्वरविरचित

# वीरशैवोत्कर्षप्रदीपिका.

हा ग्रन्थ
( महाराष्ट्र तात्पर्यासह )
वेदमूर्ति मणूर मठाध्यक्ष मल्लिकार्जुनशास्त्री
यांनीं सोलापूर येथें
'सूर्योदय' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.

आवृत्ति १ ली प्रती १०००.

शके १८३२ सन १९१०





किंमत ८४ आणे.

ॐ

रावसाहेब मल्लप्पा बसप्पा वारद ह्यांच्या उदार आश्रयाखालीं प्रसिद्ध होणारी वीरशैव-लिंगिब्राह्मणधर्मग्रंथमाला.

ग्रंथ ४१ वा.

श्रीमच्चन्नबसवेश्वरविरचित

# वीरशैवोत्कर्षप्रदीपिका.

हा ग्रन्थ

( महाराष्ट्र तात्पर्यासह )

वेदमूर्ति मणूर मठाध्यक्ष मल्लिकार्जुनशास्त्री

यांनीं सोलापूर येथें

' सूर्योदय ' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.

आवृत्ति १ ली प्रती १०००.

---

शके १८३२ सन १९१०



---

किंमत ०४ आणे.

# प्रस्तावना.

## ॥ न वीरशैवसदृशं मतमस्ति जगत्त्रये ॥

वीरशैवोत्कर्षप्रदीपिका श्लो. ८७.

ह्या जगतांत सर्व प्राणी अक्षय सुख कोणत्यारीतीनें प्राप्त होईल ह्या विचारांत निमग्न झालेले असून तत्प्राप्त्यर्थ नानाप्रकारचे अटोकाट प्रयत्न करीत आहेत असें दिसतें. परंतु वास्तविक सुख फारच थोड्यांना प्राप्त झालें असावेसें वाटतें. कारण दिशाभूल झाल्यामुळें बहुतेकांचे श्रम निष्फळच झाल्याचें दिसतें. कारण **धर्मे सर्वं प्रतिष्ठितम्** " * असें श्रुतिवचन असल्यामुळें धर्मच सर्व सुखाचें साधन आहे असें मानिलें पाहिजे. आतां धर्म ह्मणजे " **आचारः परमो धर्मः** " व **आचारस्य शिवभक्तिरेवाधारः** " असें साक्षात्परशिवानें गौरीस एके प्रसंगीं समजावून सांगितलें असें आगमवचन आहे. तसेंच **उपासनाश्रितो धर्मः** * असें श्रुतिवचनही आहे. आतां धर्म ह्मणजे आचार व आचारास शिवभक्ति आधार आहे असें वरील शिववचन असल्यामुळें शिवभक्ति ह्मणजे काय ह्याचें किंचित् दिग्दर्शन केलें असतां अप्रासंगिक होणार नाहीं असें मला वाटतें. ह्या जगतांत गुरु, लिंग, व जंगम हे शिवाचे तीन भाग आहेत. त्यांत जंगम शिवाचें मूर्तस्वरूप आहे. ह्मणून जंगमाचे ठिकाणीं जें श्रद्धापूर्वक प्रेम ठेवणें ह्यासच शिवभक्ति असें ह्मणतां येतें. अशाप्रकारची शिवभक्ति हृदयीं वागविल्यानें सदाचार व धर्म ह्यांची प्राप्ति होऊन अंतीं अक्षयसुखाची प्राप्ति होते हें सांगणें नकोच. सारांश पूर्वोक्त श्रुतिवाक्यावरून धर्म सुखाचें साधन आहे असा निष्कर्ष निघत असल्यामुळें व आपापलें सर्वोत्कृष्टत्व प्रतिपादन करणारीं अनेक धर्ममतें प्रस्तुत जगतांत प्रचलित असल्यामुळें ज्या मताप्रमाणें आपण धर्माचार पाळणार तें आपलें वीरशैवमत कोणत्याप्रकारचें आहे हें समजणें अत्यावश्य आहे. कारण सद्धर्माचें ज्ञान असल्यावांचून सदाचार कसा घडणार व सदाचाराच्या अभावीं धर्माचीं किंवा खऱ्या सुखाची प्राप्ति तरी कशी होणार? अशी कारणकार्यपरंपरा असल्यामुळें आपल्या वीरशैवमतस्वरूपाचें ज्ञान होण्यास हा अल्प ग्रन्थ फारच उपयोगी होईल असें वाटल्यावरून आह्मीं हा छापून प्रसिद्ध केला आहे. हा ग्रन्थ एका जुन्या हस्तलिखित प्रतीवरून घेतला आहे.

नैय्यायिकशिरोभूषण वे. शा. सं. लादाचार्य अगरखेडकर ह्यांनीं ह्या ग्रथाचें मराठी भाषांतर केलें व वे. शा. सं. बाळकृष्णशास्त्री व वे. मल्लिकार्जुनशास्त्री जनापूर ह्यांनीं फार श्रमपूर्वक शुद्ध करून दिलें व प्रुफें तपासलीं ह्याबद्दल मी फार आभारी आहें. तसेंच वे. जगदीशशास्त्री नालवार ह्यांनींही प्रुफ तपासण्याचे कामीं बरेच श्रम घेतल्याबद्दल मी त्यांचेही आभार मानितों.

प्रसिद्धिकर्ता.

---

* तैत्तिरीयारण्यक. अनुवाक ७९. * छान्दोग्योपनिषत् ३–१.

# विनंति.

निजगुणाराध्यकृत, १ अनुभवसार, २ परमार्थगीता, ३ पारमार्थप्रकाशिका, ४ कैवल्यपद्धति, ५ परमानुभवबोध, ६ पुरातनत्रिविडि. हे सहा ग्रंथ; तसेंच बसवेश्वरपुराण; बसवेश्वरवचन; प्रभुदेवपुराण, प्रभुदेववचन, चन्नबसवेश्वरपुराण; चन्नबसवेश्वरवचन; सांचिदेवपुराण; सांचिदेववचन; सिद्धरामेश्वरपुराण; सिद्धरामेश्वरवचन; त्याचप्रमाणें प्रमथांचीं पुराणें किंवा वचनें हे ग्रंथ जरी ह्यांपैकीं कित्येक संस्कृत ग्रंथ छापिले आहेत तरी वर लिहिलेले सर्व ग्रंथ ओवीबद्ध असल्यास साधारण लोकांसहि ते समजावेत ह्मणून प्रस्तुत छापिलेल्या निजगुणाराध्यकृत विवेकचिंतामणिप्रमाणें ओवीबद्ध छापण्याची आमची इच्छा आहे; करितां हे मराठी ओवीबद्ध ग्रंथ तसेंच उपयुक्त अशा वीरशैव लिंगिब्राह्मणांच्या संस्कृत ग्रंथांपैकीं कोणत्याही पूर्ण अगर अपूर्ण ग्रंथाच्या हस्तलिखितप्रती कोणाच्या संग्रहीं असल्यास त्यांनीं त्या आह्मांकडे अगर रावसाहेब मल्लप्पा बसप्पा वारद सोलापूर ह्यांजकडे, आपली मूळप्रत छापून झाल्यानंतर आपणांस परत मिळण्याची खात्री पाहिजे असल्यास आह्मीं अगर त्यांनीं खात्री करून दिल्यानंतर, पाठविण्याची मेहेरबानगी करावी. ह्मणजे त्यांसहि धर्मोन्नतीच्या कामीं हातभार लाविल्याचें श्रेय मिळेल. अशा रीतीनें मूळप्रत पाठविणारांकडे त्यांच्या मूळप्रतीसह दोन छापील प्रती पाठविण्यांत येतील.

प्रसिद्धिकर्ता.

# श्रीवीरशैवोत्कर्षप्रदीपिका.

——:०:——

## विषयानुक्रमणिका

॥ श्रीरस्तु ॥

## वीरशैवोत्कर्षप्रदीपिकेची संस्कृत शुद्धाशुद्धपत्रिका.

| अशुद्ध. | शुद्ध. | पान. | ओळ. |
|---|---|---|---|
| समप्रमाण्य | समप्रामाण्य | ६ | १ |
| पूर्वोक्ताग | पूर्वोक्तांग | ८ | ८ |
| शद्बस्य | शब्दस्य | ९ | २ |
| अत्याश्रमत्वं | अत्याश्रमित्वं | १० | ११ |
| शद्बार्थो | शब्दार्थो | १२ | ५ |
| शद्बानां | शब्दानां | १२ | ६ |
| शद्बानां | शब्दानां | १२ | ७ |
| सोऽत्यामश्री | सोऽत्याश्रमी | १२ | १२ |
| श्रुत्याऽगम | श्रुत्यागम | २० | ८ |
| स्वयंस्तिष्ठ | स्वयं तिष्ठ | २४ | ४ |
| ण्फलं | ष्फलं | २४ | ९ |
| ब्रह्मविद्भ्क्ते | ब्रह्मविद्भुक्ते | २५ | ५ |
| नैवैद्यं | नैवेद्यं | २५ | १० |
| स्थिरलिंगजंगम | स्थिरलिंगे जंगम | २७ | ८ |
| निष्ठा यस्य महत्मनः- | निष्ठस्यास्य महात्मनः- | २७ | १२ |
| व्रयस्त्रिपात् | त्रयस्त्रिपात् | २८ | ९ |
| पुनःशद्बो | पुनःशब्दो | २८ | ११ |
| असां निध्यं | असान्निध्यं | २८ | १२ |
| सर्वाधिकत्व | सर्वाधिकत्व | २९ | १ |
| व्यपाहेति | व्यपोहति | ३१ | ७ |

## मराठी शुद्धिपत्रिका.

| अशुद्ध. | शुद्ध. | पान. | ओळ. |
|---|---|---|---|
| अत्याश्रमी | अत्याश्रमी | १४ | १५ |

|| ॐ ||

## || वीरशैवोत्कर्षप्रदीपिका प्रारभ्यते ||



|| श्रीगणेशाय नमः || श्रीगुरुराजो विजयते || वीरशैवोत्कर्षप्रदीपिका प्रारभ्यते || श्रीशिवं सच्चिदानंदलक्षणं सर्वकारणं || महालिंगाभिधं नौमि समुपास्यं मुमुक्षुभिः || १ || गुरुमनादिनिरंजनजंगमं परमसद्गुणसौख्यपरायणं || जगति तोंटदसिद्धमहेश्वरप्रथितनामजुषं प्रणमाम्यहं || २ || लीलामूर्तिरनादिजंगममयः श्रीतोंटसिद्धेश्वरस्वैरोद्दामकृपाकटाक्षलहरीप्राप्तोपदेशोन्नतिः || धर्मान्साधु समीरयन्स्वभजकांश्छ्री-वीरशैवोचितान्बोधं वो विमलं ददातु मुरघः श्रीशान्तवीरो यतिः || ३ || शान्तवीरगुरुभूरिसत्कृपापात्रतामुपगतः समन्ततः || योऽवसत्क्षितितले विरक्तिमांस्तं नमामि गुरुसिद्धदेशिकम् || ४ || योगसिद्धगुरुसिद्धदेशिकानुग्रहाधिगतशैववैभवः || तत्त्वबोधनरतः सुधापुरे भाति चन्नबसवार्यदेशिकः || ५ || तादृशं गुरुमपृच्छदिच्छया पंडितो मुरघयाख्यशील-

---

श्रीगणेशाय नमः ( १ ) जो सत्. चित् व आनंद ह्या लक्षणांनींयुक्त आहे; जो सर्व जगदुत्पत्तीस कारण आहे; जो महालिंग ह्या नावानें जगांत प्रसिद्ध आहे, व मुमुक्षुजन ज्याची उपासना करितात त्या शिवाला मी नमस्कार करितों. (२) जो अनादिसिद्ध व जंगमस्वरूप आहे; जो सद्गुण व सौख्य ह्यांत अत्यंत निमग्न असतो व जो तोंटदसिद्धमहेश्वर ह्या नांवानें जगतांत प्रसिद्ध आहे त्या गुरूस मी नमन करितों. ( ३ ) ज्यानें लीलेनें अनादि जंगमाचें स्वरूप धारण केलें; ज्यानें तोंटदसिद्ध महास्वामीला आपला गुरु करून त्याच्या कृपावलोकनानें आपणास उपदेश घेतला व आपल्या वीरशैव भक्तांना उत्तम रीतीनें धर्मज्ञान पढविलें तो मुरघ श्रीशांतवीरस्वामी आह्मांला निर्मल ज्ञान देवो. ( ४ ) जो शांतवीरस्वामीच्या सत्कृपेस पात्र होऊन वैराग्यानें पृथ्वीतलावर संचार करीत असे त्या गुरुसिद्धदेशिकाला मी नमस्कार करितों. ( ५ ) अष्टांगयोगांत निष्णात असलेल्या त्या गुरुसिद्धदेशिकाच्या अनुग्रहानें शिवज्ञानसंपन्न झालेला व शिवतत्त्वाच्या ज्ञानोपदेशांत रत असणारा श्रीचन्नबसवाचार्य सुधापुरांत राहात असे. ( ६ ) अशा त्या चन्नबसवाचार्याला मुरघानामें एक विद्वान व शीलसं-

वान् ॥ तत्त्वमुत्तमतमं तथाविधं सन्मतं च मम कथ्यतामिति ॥ ६ ॥ इतीरयंतं मुरघाख्यशीलिनं गुरुस्तवं प्रश्नयुगोत्तरं क्रमात् ॥ कृतिं वितन्वन्निगमागमानुगां वदाम्यहं शृण्विति सोऽवदन्मुदा ॥ ७ ॥ सकलश्रुत्यागमपुराणप्रसिद्धाष्टावरणपंचाचारविशिष्टतया महालिंगैक्यरूपमोक्षसाधननिरुत्तरैकोत्तरशतस्थलगर्भीकृतषट्स्थलप्रतिपादकसिद्धांतशास्त्रप्रतिपाद्यज्ञानक्रियापरिभेदेन रूपपदार्थसमर्पणप्रकारीभूतांगलिंगभक्तिशक्तिहस्तमंत्रमुखपदार्थानुसंधानाश्रयषड्भेदभिन्नस्थानावयवीभूतेष्टलिंगप्राणलिंगभावलिंगपूजोपासनैकतानमानसतया च विशिष्टाद्वैतज्ञानसम्पन्नः श्रीवीरशैवः सर्वोत्तरः ॥ ८ ॥ तथाहि शांकरसंहितायां ॥ अष्टावरणसम्पन्नः पंचाचारपरायणः ॥ वैदिकं कर्म कुर्वीत ज्ञानैकफलसाधनं ॥ ९ ॥ यो हस्तपीठे निजलिंगमिष्टं विन्यस्य तल्लीनमनःप्रचारः ॥ बाह्यक्रियासंकुलनिस्पृहात्मा संपूजयत्यंग स वीरशैवः ॥ १० ॥ क्रिमिकीटपतंगेभ्यः पशवः

---

पन्न अशा शिष्यानें प्रश्न केला कीं, हे गुरो अत्युत्तम तत्त्वाचा व सच्छास्त्रोक्त मताचा मला उपदेश करा. ( ७ ) त्या शीलसंपन्न मुरघ शिष्यानें गौरवपूर्वक पूर्वोक्त दोन प्रश्न केल्यानंतर "वेदागमास अनुसरून मी ग्रन्थरचना करीत आहें तर तूं लक्षपूर्वक श्रवण कर" असें त्या चन्नबसवाचार्यानें त्यास आनंदानें सांगितलें. ( ८ ) सर्व श्रुति, आगम, पुराण, ह्यांत प्रसिद्ध असलेलें अष्टावरण व पंचाचार ह्यांनीं युक्त असल्यामुळें; महालिंगैक्यरूपी जो मोक्ष त्यास कारणीभूत झालेल्या एकशे एक स्थलांतच अंतर्भूत पावलेल्या षट्स्थलांचें प्रतिपादन करणाऱ्या शिवसिद्धान्त शास्त्राचें ज्ञान व क्रिया ह्यांचा भेद जाणून रूप, पदार्थ ह्यांच्या समर्पणप्रकारांसह अंग, लिंग, भक्ति, शक्ति, हस्त, मंत्र, मुख, पदार्थ, ह्यांस आश्रयीभूत असलेल्या षड्लिंगांहून भिन्न असलेलीं स्थानरूपी व अवयवरूपी इष्टलिंग, प्राणलिंग, भावलिंग ह्यांच्या पूजनांत एकनिष्ठ असलेला व विशिष्टाद्वैत ज्ञानवान् वीरशैव सर्वोत्तम होय. कारण, शंकरसंहितेंत असें सांगितलें आहे कीं, ( ९ ) अष्टावरणयुक्त व पंचाचारनिष्ठ वीरशैवानें केवल ज्ञानदायक वैदिक कर्म आचरावें. ( १० ) हे षण्मुखा, हातामध्यें आपलें इष्टलिंग धरून व तत्परायण होऊन बाहेरच्या विषयांकडे मन न जाऊं देतां जो इष्टलिंगाची पूजा करितो तो वीरशैव होय ( ११ ) किडा, मुंगी, पक्षी, यांच्यापेक्षां पशु ज्ञानानें श्रेष्ठ आहेत. पशूंपेक्षां मनुष्यें श्रेष्ठ आहेत व मनुष्यांमध्यें

प्रज्ञयाऽधिकाः ॥ पशुभ्योऽपि नराः श्रेष्ठास्तेषु श्रेष्ठा द्विजातयः ॥ ११ ॥ द्विजातिष्वधिका विप्रा विप्रेषु क्रतुबुद्धयः ॥ क्रतुबुद्धिषु कर्तारस्तेभ्यः सन्यासिनोऽधिकाः ॥ १२ ॥ तेभ्यो विज्ञानिनः श्रेष्ठास्तेषु शंकरपूजकाः ॥ तेषु श्रेष्ठा महाभाग मम लिंगांगसंगिनः ॥ १३ ॥ लिंगांगसंगिष्वधिकः षट्स्थलज्ञानवान्भवेत् ॥ तस्मादप्यधिको नास्ति त्रिषु लोकेषु सर्वदा ॥१४॥ स वंद्यः सर्वदा पूज्यः संसारविजिगीषुभिः ॥ बहुनोक्तेन किं वत्स स एवाहं न संशयः ॥ १५ ॥ पारमेश्वरागमे ॥ विभूतिर्यस्य भालेऽस्ति कण्ठे लिंगं मदात्मकं ॥ रुद्राक्षाभरणं देहे सोऽहं देवि न संशयः ॥ १६ ॥ इत्यादिप्रमाणबलाद्वीरशैवानां सर्वोत्तमत्वं सिद्धं ॥ १७ ॥ ननु ॥ श्रुतिभ्रष्टः श्रुतिप्रोक्तप्रायश्चित्ते भयंगतः ॥ क्रमेण श्रुतिसिद्ध्यर्थं मनुष्यस्तंत्रमाश्रयेत् ॥१८॥ इति " श्रुतिपथगलितानां मानवानां हि तंत्रं श्रुतिपथनिरतानां तत्सदा नैव सेव्यं ॥ १९ ॥ अत्यन्तस्खलितानां हि नराणां वेदमार्गतः ॥

---

ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य हे तीन वर्ग श्रेष्ठ होत; या तीन वर्णांमध्यें ब्राह्मण श्रेष्ठ होत. ( १२ ) ब्राह्मणांमध्यें यज्ञाविषयीं बुद्धि बाळगणारे ब्राह्मण श्रेष्ठ होत; त्यांतहीं वैदिक कर्माचरण करणारे श्रेष्ठ व त्यांहून संन्यासी श्रेष्ठ होत. ( १३ ) त्या संन्याशांपेक्षां ब्रह्मज्ञानी श्रेष्ठ, त्यांपेक्षाहि शंकराची पूजा करणारे श्रेष्ठ, त्यांच्यापेक्षां हे महाभाग लिंगधारण करणारे श्रेष्ठ होत ( १४ ) त्यांच्याहीपेक्षां पट्स्थलज्ञानी श्रेष्ठ व त्यांपेक्षां श्रेष्ठ तीन लोकांतहि कोणी नाहीं. (१५) मुमुक्षु लोकांनीं त्यांचेंच वंदन व पूजन सर्वदा करावें, शंकर ह्मणतात, हे वत्सा, फार काय सांगावयाचें आहे? तोच मी आहे. यांत कांहीं संशय नाहीं. पारमेश्वरागमांत सांगितलें आहे कीं, (१६) हे देवि, जो कपाळावर भस्म व गळ्यामध्यें माझें इष्टलिंग आणि आंगावर रुद्राक्षाची माळ धारण करितो, तोच मी आहें यांत संशय नाहीं. ( १७ ) वगैरे प्रमाणांच्या बळानें वीरशैव सर्वांमध्यें उत्तम आहेत असें सिद्ध होतें; यावर अशी एक शंका उत्पन्न होते कीं, ( १८ ) जो वेदमार्गापासून भ्रष्ट झालेला आहे आणि ज्याला वेदांत सांगितलेलें प्रायश्चित्त घेण्याबद्दल भीति वाटते, त्या मनुष्यानें क्रमाक्रमानें वेदमार्गामध्यें प्रवेश करावयास तंत्रांत सांगितलेला मार्ग धरावा. ( १९ ) आणि ज्यांस वेदांचा अधिकार नाहीं, त्यांनींच तंत्रोक्त आचार करावा. ज्यांस वेदांचा अधिकार आहे त्यांनीं तंत्रांत सांगितलेला आचार करूं नये. ( २० ) जे वेदमार्गा-

पांचरात्रादयो मार्गाः कालेनैवोपकारकाः ॥ २० ॥ कापालं पांचरात्रं च यामलं वाममर्हतं ॥ एवं विधानि चान्यानि मोहनार्थानि तानि तु ॥२१॥ विड्भक्षाश्चैव ये केचित्कापालकृतभूषणाः ॥ शैवाः पाशुपताश्चान्ये पांचरात्रास्तथापरे ॥ तथाऽन्ये च दुरात्मानः सर्वेऽप्यसुरदेवताः ॥ २२ ॥ पाशब्देन त्रयीधर्मो जगतः पालनात्स्मृतः ॥ तं खंडयति यस्मात्ते पाषंडास्तेन हेतुना ॥ २३ ॥ इत्यादिकौर्मब्रह्मवैवर्तसूतसंहितावासिष्ठलैंग्यपराशरोपपुराणवचनैः केवलतंत्रमार्गाश्रयणस्य निंदितत्वात् वीरशैवानुष्ठेयधर्माणां तादृशतंत्रेष्वेव विहितत्वेन वैदिकेषु श्रुतिस्मृतीतिहासेष्वप्यदर्शनात्तादृशधर्मानुष्ठानैकतत्पराणां वीरशैवानां कथंकारमुत्कर्षःप्रसाद्यत इति चेन्नैवं ॥२४॥ सांख्यं योगः पांचरात्रं वेदः पाशुपतं तथा ॥ आत्मप्रमाणान्येतानि नो हंतव्यानि हेतुभिः ॥ २५ ॥ इत्यानुशासानिकमहाभारतवचनात् पुराणांतरैर्निंदितानां पांचरात्राद्यागमानां ग्राह्यत्वप्राप्त्या तदुदीरितधर्माणामप्य-

---

पासून अत्यंत भ्रष्ट झाले आहेत, त्यांनीं पांचरात्र वगैरे आगमांत सांगितलेला धर्म केला असतां कालानें त्यांस त्या धर्माचें फळ मिळतें. ( २१ ) कापाल, पांचरात्र, यामल, वाम, अर्हत, हे ग्रंथ पूर्वोक्त लोकांला मोह घालण्याकरितां ईश्वरानें निर्माण केले आहेत. ( २२ ) रुंडमाळा घालून अभक्ष्य भक्षण करणारे पाशुपत मतांतले जे शैव आहेत ते, व दुसरे पांचरात्रोक्त धर्म करणारे, आणि दुसरे दुष्ट लोक हे सर्व दैत्यानां देव मानणारे होत. ( २३ ) "पा" ह्मणजे जगाचें पालन करणारा वेदोक्त धर्म, त्याचे खंडन करितात. ह्मणून ते पाखंडी होत. ( २४ ) याप्रमाणें कूर्मपुराण, ब्रह्मवैवर्त, सूतसंहिता, वासिष्ठ,लैंग्य, पाराशर ह्या उपपुराणांतल्या वचनांवरून केवळ तंत्रोक्त धर्माचरण करणें निषिद्ध आहे व वीरशैवधर्म केवळ तंत्रांत सांगितलेला आहे तो श्रुति, स्मृति, पुराण ह्यांत सांगितलेला नाहीं, ह्मणून तो वीरशैव धर्म निंदित आहे तर मग त्या धर्माचें आचरण करणारे वीरशैव सर्वांमध्यें उत्तम कसे वरें होतील ? अशी शंका घेणें योग्य नाहीं ( २५ ) कारण सांख्य, योग, पांचरात्र, वेद, आणि शैवागम हे ग्रंथ स्वतः प्रमाण आहेत, ह्मणून ते युक्तिवाद करण्यास योग्य नाहींत. ( २६ ) असें भारतामध्यें अनुशासनपर्वांत सांगितलें आहे; ह्मणून इतर पुराणांनीं निंद्य मानिलेले पांचरात्रादि आगम प्रमाणभूत आहेत असें सिद्ध झाल्यामुळें पूर्वोक्त पांचरात्रादि आगमांत सांगितलेले धर्म अवश्य

वश्यमनुष्ठेयत्वं सिद्धमेव ॥ २६ ॥ न च भारतवचनेन पांचरात्रपाशुपतधर्माणामेवाचरणीयत्वपर्यवसानेऽपि वीरशैवधर्माणां पाशुपतानंतर्भावात्कथं तद्धर्मानुष्ठानपराणामुत्कर्ष इति वाच्यं ॥ २७ ॥ पाशुपतस्य वैदिकावैदिकभेदेन द्वैविध्यं निषेधवचनानामवैदिकपाशुपतपरत्वेन विधिवचनानां वैदिकपाशुपतवीरशैवपरत्वेन व्यवस्थाया एव अप्पय्यदीक्षितैः कल्पतरुव्याख्याने परिमले " पत्युरसामंज्यस्यात् " इत्यधिकरणे पाशुपतभेदमुक्त्वा तत्र लगुडीशपाशुपतस्य ग्राह्यत्वमभ्यधायि॥ तस्मात् वीरशैवधर्माणां तांत्रिकत्वं निषेध्यतावच्छेदकं न भवति ननु लगुडीशपाशुपतस्याप्यप्पय्यदीक्षितैः कृते परिमले वैदिकत्वेन ग्राह्यत्वप्रतिपादनेऽपि वीरशैवधर्मप्रतिपादकागमानां लगुडीशपाशुपतान्तर्भावभिन्नत्वात् तेषामवैदिकत्वेन ग्राह्यत्वं पर्यवसितमिति चेन्न ॥ २८ ॥ सिद्धान्तशिखामणौ " वेदसिद्धान्तयोरैक्यमेकार्थप्रतिपादनात् । प्रामाण्यं सदृशं ज्ञेयं पंडितैरेतयो-

---

आचरिले पाहिजेत असें सिद्ध होतें. ( २७ ) पुनः अशी एक शंका येते कीं, अहो, महाभारतांतल्या प्रमाणांनीं पांचरात्रागम व पाशुपतागम यांत सांगितलेलें अवश्य आचरणच करावें असें ठरतें तथापि वीरशैव धर्माचा पाशुपत धर्मांत अंतर्भाव होत नसल्यामुळें, पाशुपतधर्माहून वेगळ्या अशा वीरशैव धर्माचें अनुष्ठान करणाऱ्या वीरशैवांचें श्रेष्ठत्व कसें मानावें? ( २८ ) या शंकेला उत्तर असें आहे कीं, वैदिक, व अवैदिक ह्मणून पाशुपत धर्म दोन प्रकारचे आहेत. त्यांत निषेधवचनें अवैदिकपाशुपतधर्मपर असून, विधिवचनें वैदिकपाशुपतवीरशैव धर्मपर आहेत अशी व्यवस्था लावून, अप्पय्य दीक्षितांनीं कल्पतरु ग्रन्थाच्या परिमलनामक व्याख्यानांतील " पत्युरसामंजस्यात् " ह्या अधिकरणांत पाशुपत भेदाचा उल्लेख करून, त्यांत लगुडीशपाशुपत धर्म ग्राह्य आहे असें ह्मटलें आहे. याकारणानें वीरशैवधर्म जरी तांत्रिक आहे, तरी शास्त्रनिषिद्ध होत नाहीं. अप्पय्य दीक्षितानें केलेल्या परिमलग्रंथामध्यें लगुडीशपाशुपत वेदाला संमत असल्यामुळें ग्राह्य ठरविलें तरी वीरशैवागम लगुडीशपाशुपताहून वेगळे असल्यानें वेदाला संमत नाहींत. ह्मणून ते आगम ग्रहण करण्यास योग्य नाहींत, अशी शंका आली तर उत्तर देतात कीं, ( २९ ) वेद व शैवागम या दोन्हींचा अर्थ एकच असल्यामुळें ते दोन्ही एकच समजावेत, अर्थात् त्या दोन्हींमध्यें असलेलें प्रामाण्य सारखें आहे,

स्सदा" ॥२९॥ क्रियासारे॥ "अथवा शिवनिश्वाससश्रुतिभ्यस्ते शिवागमाः। अधिकाः शिववक्त्रेभ्यः साक्षादेव विनिर्गताः॥ ३०॥ परस्परा विरुद्धार्थाः शिवोक्ता निगमागमाः। अल्पबुद्धिभिरन्योन्यविरोधः परिकल्प्यते॥३१॥ निगमानामागमानां परमाप्तोपदेशतः। प्रामाण्यमविशेषेण ज्ञातव्यं तत्त्वदर्शिभिः॥ ३२॥ इति वचनैर्वेदाविरुद्धवर्णाश्रमधर्मप्रतिपादकत्वेन सर्वाप्तपरमेश्वरैककर्तृत्वेन प्रामाण्यस्य शिष्टैरभ्युपगंतव्यत्वात् तदागमोक्ताचाराणां सर्वेषां वैदिकानुष्ठेयत्वं सिद्धं॥ ३३॥ अन्यथा शिवादिदेवतालयनिर्माणशिवलिंगादिप्रतिष्ठारथोत्सवादिविधिमंत्रोद्धारमंत्रदोषमंत्रसंस्कारमंत्रन्यासमुद्राविधानादिषु केवलशिवागमसूलेषु वैदिकानां प्रवृत्तिर्न स्यात्॥ ३४॥ किंच सूतसंहितायां शिवमाहात्म्यखंडे व्यासवचनाविश्रंभणीयत्वप्रस्तावे "अष्टादशपुराणानां कर्ता सत्यवतीसुतः। कामिकादिप्रभेदानां

---

असें पंडितांनीं समजावें, ह्याप्रमाणें सिद्धांतशिखामणीग्रंथांत सांगितलें आहे. क्रियासारांत सांगितलें आहे कीं, (३०) शिवाच्या श्वासोच्छ्वासापासून निघालेल्या वेदांपेक्षां शिवागम श्रेष्ठ आहेत; कारण ते साक्षात् शिवमुखांतून निघाले आहेत. (३१) शिवानें सांगितलेले वेद व आगम ह्यांचा अर्थ परस्परांशीं विरुद्ध नाहीं. मूर्ख लोक आगमांचा अर्थ वेदविरुद्ध आहे, असें मानितात. (३२) वेद व आगम हे दोन्हीं परमेश्वरानेंच सांगितलेले आहेत, करितां या दोहोंमध्यें सारखें प्रामाण्य आहे असें तत्त्वज्ञांनीं जाणावें. (३३) ह्या वचनांवरून ते आगम वेदांस विरुद्ध नसलेल्या वर्णाश्रमधर्माचेंच प्रतिपादन करीत असल्यामुळें व ते सर्वांस प्रमाण असलेल्या एकाच ईश्वरापासून उत्पन्न झाले असल्यामुळें ते विद्वानांस प्रमाणभूत आहेत ह्मणून त्या आगमांत सांगितलेले आचार सर्वांनीं वैदिक असें समजून आचारिले पाहिजेत असें सिद्ध झालें. कारण (३४) असें नसेल तर शिवालयनिर्माण, लिंगस्थापन, रथोत्सवादि विधि, मंत्रोद्धार, मंत्रदोष, मंत्रसंस्कार, मंत्रन्यास, मुद्राविधान, वगैरे धर्म केवळ शिवागमांतच सांगितले असल्यामुळें त्या धर्मांकडे वैदिकांची प्रवृत्ति होणार नाहीं. (३५) सूतसंहितेंतील शिवमाहात्म्यखंडामध्यें "व्यासाच्या वचनावर विश्वास ठेवावा असा एक कथाप्रसंग निघाला असतां असें ह्मटलें आहे कीं, परमेश्वर जसा कामिक वगैरे आगमांचा कर्ता

यथा देवो महेश्वरः ॥ ३५ ॥ इति ॥ तद्व्याख्याने विद्यारण्यश्रीपादैर्व्यासवचनेषु विश्वासोत्पादनार्थमष्टादश इत्युपक्रम्य कामिकादीनां शैवागमानां शिवोक्ततया प्रामाण्यं यथातथा नारायणावताररूपव्यासप्रणीतानामष्टादशपुराणानां प्रामाण्यमिति प्रतिपादितं तस्मात्तदागमोक्तानां वीरशैवधर्माणामनुष्ठेयत्वं सिद्धं ॥ ३६ ॥ तथाच तदागमेष्वनादिशैवमादिशैवं महाशैवमनुशैवमवांतरशैवं प्रवरशैवमंत्यशैवमिति भेदेन सप्तविधानां शैवानां मध्ये आचारभेदभिन्नानां सामान्यशैवमिश्रशैवशुद्धशैववीरशैवरूपतया चतुर्विधानां मध्ये वीरशैवस्याचारभेदेन सामान्यवीरशैवविशेषवीरशैवनिराभारवीरशैवभेदेन त्रिविधानां तदनुष्ठेयभस्मरुद्राक्षधारणपंचाक्षरीजपलिंगधारणगुरुलिंगजंगमपूजातत्पादोदकप्रसादस्वीकाररूपासाधारणवीरशैवधर्माणां कालाग्निरुद्रभस्मजाबालचिदंबरवेदान्तसाराद्युपनिषत्सु लिंगधारणादिप्रतिपादकेषु बृहत्तैत्तिरीयादिमंत्रेषु शंकरसंहितासूतसंहिताशिवरहस्यलिंगपुराणादिषु कामिकादिवातुलान्तेषु चाष्टाविंशतिशैवागमेषु·

---

आहे त्याप्रमाणें व्यास आठरा पुराणांचा कर्ता आहे. ( ३६ ) या श्लोकाच्या व्याख्यानाच्या वेळेस श्रीविद्यारणस्वामीनीं व्यासाच्या वचनावर विश्वास उत्पन्न करण्याकरितां अष्टादश असा आरंभ करून कामिकादि शैवागम शिवोक्त असल्यामुळें जसे ते जगांत प्रमाणभूत झाले आहेत, त्याप्रमाणें नारायणावताररूपी श्रीव्यासानें केलेलीं अठरा पुराणें देखील प्रमाणभूत आहेत, असें प्रतिपादिलें आहे. याकरितां शिवागमांत सांगितलेले वीरशैवधर्म करावयास योग्य आहेत असें सिद्ध झालें. ( ३७ ) तसेंच त्या आगमामध्यें सांगितलेले अनादिशैव, आदिशैव, महाशैव, अनुशैव, अवांतरशैव, प्रवरशैव, अंत्यशैव ह्या सात प्रकारच्या शैवांमध्यें आचारभेदानें भिन्न झालेल्या सामान्यशैव, मिश्रशैव, शुद्धशैव, वीरशैव असे पुनः चार प्रकार झाले. त्या चार प्रकारांतील वीरशैवांचे आचारभेदानें सामान्यवीरशैव, विशेषवीरशैव, निराभारवीरशैव असे तीन प्रकार झाले. ह्या तीन प्रकारच्या वीरशैवांनीं आचरण्याचे भस्मरुद्राक्षधारण पंचाक्षरमंत्राचा जप, लिंगधारण, गुरुलिंग, जंगमपूजा व त्यांचा पादोदकप्रसादस्वीकार हे असाधारण धर्म कालाग्निरुद्र, भस्मजाबाल, चिदंबर, वेदांतसार वगैरे उपनिषदांमध्यें; लिंगधारणादिप्रतिपादक बृहत्तैत्तिरीय मंत्रांमध्यें; शंकरसंहिता, सूतसंहिता, शिवरहस्य, लिंगपुराण,

प्रतिपादितानामाराध्यशाब्दितवीरशैवेषु च सत्वाद्वैदिकत्वं सिद्धं ॥ ३७॥ अन्यथा वैदिकत्वेनाभिमतानां ब्राह्मणानां रथोत्सवप्रतिष्ठादितांत्रिकधर्मानुष्ठानवतां वैदिकत्वं न स्यात् ॥ तथाच तत्समानन्यायतयोक्तवैदिकत्वं निरपायं ॥ ३८ ॥ ननु वीरशैवधर्मप्रतिपादकश्रुत्यागमानामाचरभेदेन सामान्याविशेषनिराभारसमाख्यावतां भक्तमाहेश्वरप्रसादिप्राणलिंगिशरणैक्यस्थलानामाचारलिंगगुरुलिंगशिवलिंगजंगमलिंगप्रसादलिंगमहालिंगाभिधानानां लिंगस्थलानां पूर्वोक्तांगस्थलानां चोत्तरोत्तरधर्माचरणस्य पूर्वधर्माचरणानंतरभावितया क्रमिकत्वेन तादृशधर्माचरणस्य कालहस्तिश्रीशैलादिदेशस्थितयज्ञोपवीतधारणलिंगधारणादिवैदिकतांत्रिकधर्मसमुच्चयानुष्ठानपराराध्यविषयत्वेन नेतुं शक्यत्वात्कथमाराध्येतरकेवलवीरशैवविषयत्वमिति चेन्न ॥ ३९ ॥ "अत्याश्रमिभ्यः परमं पवित्रं प्रोवाच सम्यगृषिसंघजुष्टमिति" ॥ श्वेताश्वतरोपनिषदि ॥ ४० ॥ "अत्याश्रमी सर्वदा स-

---

इत्यादि ग्रन्थांमध्यें व ते कामिकादि अठ्ठावीस आगमामध्यें सांगितले असून आराध्यनामक वीरशैवांमध्यें देखील असल्यामुळें त्यांचें वैदिकत्व सिद्ध होतें. (३८) पूर्वोक्त धर्मांचें वैदिकत्व न स्वीकारिल्यास रथोत्सव, लिंगस्थापन वगैरे वैदिक धर्म ह्मणून आचरणाऱ्या वैदिक ब्राह्मणांचाहि वैदिकत्वनाश संभवेल ह्मणून आराध्य व वीरशैव यांस समान न्यायानें प्राप्त झालेलें वैदिकत्व अबाधित आहे. ( ३९ ) आतां यावर ही एक शंका येते कीं, वीरशवैधर्मप्रतिपादक श्रुति व आगम यांमध्यें आचारभिन्नत्वानें सामान्य, विशेष, निराभार ह्मणून झालेल्या तीन प्रकारच्या वीरशैवांनीं, भक्त, माहेश्वर, प्रसादि, प्राणलिंगी, शरण, ऐक्य अशा सहा प्रकारचीं अंगस्थलें आणि आचारलिंग, गुरुलिंग, शिवलिंग, जंगमलिंग, प्रसादलिंग, महालिंग अशीं सहा लिंगस्थलें अनुक्रमें पायरी पायरीनें आचरण्याचीं आहेत. तशा प्रकारचें धर्माचरण कालहस्ति व श्रीशैल वगैरे देशांत राहणाऱ्या आणि यज्ञोपवीत व लिंगधारणादि वैदिक व तांत्रिक धर्मसमुच्चयाचें अनुष्ठान करणाऱ्या आराध्य ब्राह्मणांचाहि विषय होऊं शकेल. तर मग आराध्येतर केवळ वीरशैवांसच तें धर्माचरण कसें विषयीभूत आहे अशी शंका योग्य नाहीं. कारण ( ४० ) परमेश्वरानें अत्याश्रमी लोकांला पुरातन ऋषींनीं स्वीकार केलेला पवित्र धर्म सांगितला असें श्वेताश्वतर उपनिषदामध्यें सांगितलें आहे. ( ४१ ) अत्याश्रमीनें मंत्राचा जप नेहमीं किंवा एकवार

कृद्वा जपेदिति कैवल्योपनिषदि च ” ॥४१॥ श्रूयमाणस्यात्याश्रमिशब्दस्य॥ “ ब्रह्मचारी गृहस्थश्च वानप्रस्थश्च भिक्षुकः ॥ अतिवर्णाश्रमी चेति क्रमाच्छ्रेष्ठा विचक्षणाः ॥ ४२ ॥ गृहस्थोऽपि वनस्थस्य यतेरप्यंबुजेक्षण ॥ विद्योत्कर्षबलेनैव गुरुर्भवति नान्यथा ॥ ४३ ॥ वानप्रस्थाश्रमस्थोऽपि तथा सन्यासिनो हरे ॥ विद्योत्कर्षबलेनैव गुरुर्भवति नान्यथा ॥ ४४ ॥ अतिवर्णाश्रमी प्रोक्तो गुरुः सर्वाधिकारिणां ॥ न तस्यापि भवेच्छ्रेष्ठो यथाऽहं पुरुषोत्तम ॥ अतिवर्णाश्रमी साक्षाद्गुरूणां गुरुरुच्यते ॥ ४५ ॥ यस्य वर्णाश्रमाचारो गलितः स्वात्मदर्शनात् ॥ सवर्णानाश्रमान्सर्वानतीत्य स्वात्मनि स्थितः ॥ ४६ ॥ योऽतीत्य स्वाश्रमान्वर्णानात्मन्येव स्थितः पुमान् ॥ सोऽतिवर्णाश्रमी प्रोक्तः सर्ववेदार्थवादिभिः ॥ ४७ ॥ पंचाक्षरी परा विद्या शिवज्योतिरवाप्तये ॥४८॥ ॐकारः प्रणवः साक्षाद्विद्यानां बीजमुत्तमम् ॥ तस्मादशेषतत्त्वानि प्रणवेन विशोधयेत् ॥ ४९ ॥ भस्मनोद्धूलयेद्देहमग्नि-

---

तरी करावा असें कैवल्योपनिषदामध्यें सांगितलें आहे. ( ४२ ) या दोन्ही उपनिषदांमध्यें असलेला “ अत्याश्रमि ” हा शब्द वीरशैवालाच लागू पडतो. कारण हे कुशल, ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ, संन्यासी, अतिवर्णाश्रमी हे पांच उत्तरोत्तर श्रेष्ठ आहेत. ( ४३ ) त्यांत हे कमलनयन, गृहस्थ असूनही जर तो विशेष ज्ञानी असला तर वानप्रस्थाचा व संन्याशाचा गुरु होतो. ज्ञानी नसेल तर गुरु होणार नाहीं. ( ४४ ) तसाच हे हरी, वानप्रस्थही ज्ञानाच्या बलानें संन्याशाचा गुरु होतो; नाहीं तर नाहीं. ( ४५ ) अतिवर्णाश्रमी हा सर्वांचा गुरु असून त्यापेक्षां श्रेष्ठ कोणी नाहीं. हे पुरुषोत्तमा जसा मी सर्वांचा गुरु आहे त्याप्रमाणें अतिवर्णाश्रमी गुरूंचा देखील गुरु आहे. ( ४६ ) ब्रह्मज्ञानानें वर्ण व आश्रम यांचा आचार ज्याचा नाहींसा झालेला आहे व वर्ण व आश्रम यांना ओलांडून जो स्वस्वरूपामध्यें निमग्न झालेला आहे, ( ४७ ) जो पुरुष स्वाश्रम व वर्ण ह्यांचें अतिक्रमण करून आत्मस्वरूपीं निमग्न झाला त्याला सर्व वेदार्थवाद्यांनीं अतिवर्णाश्रमी ह्मणावें. ( ४८ ) पंचाक्षरमंत्र सर्व मंत्रांमध्यें श्रेष्ठ असून शिवाची सायुज्यमुक्ति देणारा आहे. ( ४९ ) ॐकार सर्व मंत्रांचें बीज आहे. ह्याकरितां ॐकारमंत्रानें शरीरांतील सर्व तत्त्वें शुद्ध करावींत ( ५० ) अग्निरिती वगैरे सात मंत्रांनीं शरीरावर भस्म

रित्यादिसप्तभिः ॥ त्रियायुषं जमदग्नेरिति कुर्यात्त्रिपुण्ड्रकं ॥ ५० ॥ विचिंतयेत्स्वात्मनि शंभुमीशं शिवं परं शांतमुमासहायं ॥ भस्मांगमाविष्कृतदीप्रदेहमत्याश्रमाचारमिमं वदन्ति ॥ ५१ ॥ अत्याश्रमोऽयं सर्वेषु चतुर्ष्वप्याश्रमेषु च ॥ यः पशुः स पशुत्वं च व्रतेनानेन संत्यजेत् ॥ ५२ ॥ विशोध्य सर्वतत्त्वानि प्रणवेनाथवा पुनः ॥ संस्थाप्य मयि चात्मानं निर्मले परमेश्वरे ॥ ५३ ॥ प्लावयेदात्मनो देहं तेनैव ज्ञानवारिणा ॥ एष पाशुपतो योगः पशुपाशविमुक्तये ॥ ५४ ॥ सर्ववेदांतसारोऽयमत्याश्रम इति श्रुतिः॥ व्रतं पाशुपतं येन सम्यगाचरितं मुदा ॥ तस्य ज्ञानं विजायेत तेन पाशविमोचनम् ॥ ५५ ॥ " इत्यादि कामिकस्कांदलैंग्यशिवागमवचनैरतिवर्णाश्रमिणां वर्णाश्रमधर्माचरणशीलेभ्य उत्कृष्टत्वप्रतिपादनात् ॥ अत्याश्रमत्वं पंचमुखसमुद्भूतपंचमाश्रमवत्सु वीरशैवब्राह्मणेषु पर्यवस्यतीति न पूर्वोक्ताराध्यपरत्वशंकावकाशः ॥५६॥ अत एव पूर्वोक्तक्रिमिकीटपतंगेभ्य इत्यादि

---

उधळावें. " त्रियायुषं जमदग्नेः " या मंत्रानें कपाळावर त्रिपुंड्र करावें. ( ५१ ) नंतर सुख देणारा, शांत, भस्म धारण केलेला, उमेसहित अशा परशिवाचें हृदयांत चिंतन करावें ह्यास ज्ञानी लोक अत्याश्रमाचार ह्मणतात. ( ५२ ) चार आश्रमांपेक्षां हा अत्याश्रम श्रेष्ठ आहे. ह्या आश्रमाचा आचार करण्यानें जीव जीवपणा सोडून ब्रह्मरूप होतो. ( ५३ ) अथवा पुनः शरीरांतील सर्व तत्त्वांचें प्रणवमंत्रानें शोधन करून निर्मल असा जो मी परमेश्वर त्या माझ्या ठिकाणीं मन लावून ( ५४ ) ज्ञानरूप पाण्यानें देह धुवून काढावा; जीव अज्ञानरूप पाशापासून मुक्त होण्यास हाच पाशुपत योग आहे. ( ५५ ) हा अत्याश्रम सर्व वेदान्तांचें सार आहे, असें श्रुतीचें ह्मणणें आहे. हा पाशुपतयोग जो मनुष्य आनंदानें उत्तम रीतीनें करील त्या मनुष्याला ज्ञान उत्पन्न होतें, व त्यानें अज्ञानरूप पाश नाहींसा होतो. ( ५६ ) याप्रमाणें कामिकागम, स्कंदपुराण, लिंगपुराण, शिवागम ह्या ग्रंन्थांतील वचनांनीं वर्णाश्रमधर्माचरण करणाऱ्या पुरुषांपेक्षां अतिवर्णाश्रमीचें श्रेष्ठत्व प्रतिपादिलें आहे ह्मणून परमेश्वराच्या पांच मुखांपासून उत्पन्न झालेल्या पंचमाश्रमी वीरशैव ब्राह्मणांनाच अत्याश्रमी हा शब्द लागू पडतो. आणि वर सांगितलेले आराध्य ब्राह्मण अत्याश्रमी होऊं शकत नाहींत. ( ५७ ) ह्मणूनच पूर्वीं सांगितलेलें " क्रिमिकीटपतंगेभ्यः " इत्यादि वीरशैवांचा उत्कर्ष प्रतिपादन करणारें शंकरसंहि-

वीरशैवोत्कर्षप्रतिपादकं शांकरसंहितावचनमव्यभिचरिततया पर्यवस्यति ॥ ५७ ॥ ननु ॥ अत्याश्रमप्रतिपादकश्रुत्यागमपुराणवचनानि न तेष्वेव पर्यवस्यान्ति ॥ किंतु ॥ वर्णाश्रमाचारवत्सु ब्राह्मणेष्वाराध्येषु तदतिरिक्तेष्वपि पर्यवस्यंति ॥ ५८ ॥ तथाहि ॥ अतिवर्णाश्रमाचार इत्यत्र ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्राश्चेति चत्वारो वर्णाः ॥ अशूद्राणामदुष्टकर्मणामुपनयनमध्ययनमग्न्याधानं फलवन्ति च कर्माणि योग्यानि ॥ ब्रह्मचर्यगार्हस्थ्यवानप्रस्थत्वसन्यासित्वभेदेनाश्रमाश्चत्वारः ॥ तत्र ॥ गुरुकुलवासभिक्षाचरणवेदाध्ययनादिकं प्रथमाश्रमधर्मः ॥ ५९ ॥ गर्भाधानादिगार्ह्यकर्मसप्तपाकयज्ञसप्तहविर्यज्ञसप्तसंस्थायज्ञपंचमहायज्ञरूपाष्टचत्वारिंशत्संस्काराः॥ यजनयाजनाध्ययनाध्यापनदानप्रतिग्रहरूपाणि षट्कर्माणि च द्वितीयाश्रमधर्माः ॥ ६० ॥ वनवासनीवारकंदफलाहारनियमजटाजिनधारणकृच्छ्रचांद्रायणाद्याचरणं तृतीयाश्रमधर्मः ॥ ६१ ॥ पूर्वोक्ताश्रमत्रयधर्मत्यागपूर्वकं

---

तेंतील वचन केवळ वीरशैवांलाच लागू आहे. ( ५८ ) आतां अशी शंका येते कीं, अत्याश्रमाचें प्रतिपादन करणारीं, श्रुति, आगम पुराणें ह्यांतील वचनें वीरशैवानांच केवळ उद्देशून नाहींत. तर वर्णाश्रमाचार पाळणाऱ्या आराध्य ब्राह्मणांस व इतर ब्राह्मणांसही हीं वचनें लागू आहेत. ( ५९ ) कारण अतिवर्णाश्रमाचार ह्या वचनामध्यें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, असे चार वर्ण आहेत. शूद्रांखेरीज उत्तम कर्म करणाऱ्या तीन वर्णांतील लोकांना उपनयन, वेदाध्ययन, अग्निहोत्र वगैरे शुभफलदायक कर्मांचा अधिकार आहे. आणि त्या तीन वर्णांतील प्रत्येकाला ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ, सन्यास, ह्मणून चार आश्रम आहेत. त्यांमध्यें गुरूच्या घरीं राहणें, मधुकरी मागणें व वेदाध्ययन वगैरे करणें हें ब्रह्मचर्याश्रमाचे धर्म आहेत. ( ६० ) गर्भाधान वगैरे गृहस्थांचीं कर्मे, सप्तपाकयज्ञ, सप्तहविर्यज्ञ, सप्तसंस्थायज्ञ, पंच महायज्ञ, वगैरे अठ्ठेचाळीस संस्कार, आणि यज्ञ करणें, व करविणें, स्वतः अध्ययन करणें व करविणें, दान देणें, व घेणें हीं सहा कर्मे गृहस्थाचे धर्म आहेत. ( ६१ ) वनामध्यें राहणें, तृणधान्य, कंद, फल, वगैरेंचा आहार करणें; व्रत, उपोषण वगैरे नियम पाळणें, जटा राखणें, कृष्णाजिन धारण करणें; कृच्छ्र, चांद्रायण वगैरे व्रतें करणें हे वानप्रस्थाचे धर्म होत. ( ६२ ) वर सांगितलेल्या तीन आश्रमांतील सर्व कर्मांचा त्याग करून ब्रह्मविचार करणें, भिक्षा

ब्रह्मविचारभिक्षाचरणरागद्वेषादिवर्जनवाङ्नियमैकवासयोगाभ्यसनादिकं तुरीयाश्रमधर्मः ॥ ६२ ॥ अतिवर्णाश्रमाचार इत्यत्रातिक्रान्तो वर्णाश्रमाचारानिति "अत्यादयःक्रान्ताद्यर्थे द्वितीया" इति व्याकरणानुशासनमर्यादया शब्दार्थो योजनीयः स च पूर्वोक्तधर्माचरणवत्सु संभवत्यतिवर्णाश्रमाचारादिशब्दानां प्रतियोगिप्रसक्तिसापेक्षाणां प्रतियोगिसंबंधं विना कृतेषु आराध्यव्यतिरिक्तेषु वीरशैवेषु वृत्तिः कथमुपपद्यते निषेधवाचकानां शब्दानां प्रतियोगिसंबंधिसंभावनाशालिष्वेव वर्तनौचित्यादितिचेन्न ॥ ६३ ॥ अतिवर्णाश्रमाचाराः संभवंत्यूर्ध्ववक्त्रतः ॥ ते वै साक्षान्महादेवे मोदन्ते ह्यागमेषु च ॥ ६४ ॥ पंचास्यपंचममुखाद्यथा जातास्ततोऽधिकाः ॥ पंचमाः सर्ववर्णेभ्यो मद्भक्ता मत्प्रियाः सदा ॥ इति ॥ ६५ ॥ लिंगं शिवो भवेत्क्षेत्रमंगं संयोग आश्रयः ॥ तस्माल्लिंगांगसंयुक्तो योऽपि सोऽत्याश्रमी भवेत् ॥६६॥ "ईशानकास्याद्गणवंशजानां लिंगांगशोभा मोक्षमार्गैकनिष्ठाः" ॥ "लिंगां-

---

मागून निर्वाह करणें, रागद्वेष वगैरे टाकणें, परिमित भाषण करणें, एका ठिकाणीं राहणें, योगाभ्यास करणें, हे सन्यासाश्रमाचे धर्म होत. ( ६३ ) अतिवर्णाश्रमाचार यामध्यें "अतिक्रांतः वर्णाश्रमाचारान्" ह्याप्रमाणें "अत्यादयः क्रांताद्यर्थे द्वितीया" ह्या सूत्रानें समास करून वर्णाश्रमाचाराच्या पलीकडे गेलेला असा अर्थ केला असतां वीरशैव अतिवर्णाश्रमाचारी होऊं शकत नाहींत; कारण वीरशैवांना वर्णाश्रमाचा मुळींच संबंध नसल्यामुळें ते अतिवर्णाश्रमी कसे होतील? प्रथमतः विधीचा संभव असेल तर कारणपरत्वें त्याचा निषेध करतां येतो. आतां वर्णाश्रमाचाराचा संबंध आराध्य ब्राह्मणांमध्यें पूर्वीं असतो, ह्मणून लिंगधारण केल्यानंतर ते अतिवर्णाश्रमाचारी होतात. वीरशैव अतिवर्णाश्रमी होत नाहींत, ह्या शंकेचें समाधान असें आहे कीं, ( ६४ ) अतिवर्णाश्रमाचारी लोक परमेश्वराच्या ऊर्ध्वमुखापासून उत्पन्न होतात. त्यांची भक्ति, परमेश्वराच्या ठिकाणीं व शिवागमाच्या ठिकाणीं असते. ( ६५ ) पंचवक्त्र गणाधीश्वराच्या पांच मुखांपासून पंचम उत्पन्न झाले, ह्यामुळें ते सर्व वर्णांपेक्षां अधिक असून ते माझे नित्य प्रिय भक्त आहेत. ( ६६ ) लिंग ह्मणजे शिव, अंग ह्मणजे शरीर ( देवालय ) संयोग ह्मणजे आश्रय, ह्याकरितां ज्याच्या अंगाला लिंगाचा संयोग आहे तो अत्याश्रमी ह्मणावा. ( ६७ ) अंगामध्यें लिंग धारण करून मोक्षमार्गामध्यें तत्पर असणारे शैव महा-

गसामरस्यं च शरीरे लिंगधारणं ॥ नियमेनैव कृत्वा ते मुक्ताः संसार-बंधनात् ॥ ६७ ॥ इति कामिकाद्यागमक्रियासारोदाहृतवेदांतसारोपनिषदादिवचनैर्वीरशैवानामेवातिवर्णाश्रमाचारादिशब्दानां रूढ्याभिधेयत्वस्य सम्यग्वक्तुं शक्यत्वात् ॥ न चात्याश्रमिशब्दः कृताश्रमधर्माचरणेषु वर्तते न प्रतियोगिकशब्दत्वादिति यदुक्तं तदुपपन्नं ॥ अपहतपाप्मादिशब्दानां वैदिकानां ब्रह्मणि प्रतियोगिनां पाप्मनामसंभवात्प्रवृत्तिर्न स्यात् ॥ तथा चतुर्वर्णाश्रमधर्माणामनुष्ठानप्रतियोग्यभावेनात्याश्रमादिशब्दवाच्यत्वं संगच्छते ॥ न चात्यादय इति व्याकरणानुशासनविरोध इति वाच्यं ॥ शुकवामदेवादिवज्जन्मान्तरीयवर्णाश्रमधर्मानुष्ठानप्रकल्पनान्न वैयाकरणानुशासनविरोधः ॥ ६८ ॥ न चैवमत्याश्रमिशब्दार्थसंगतिनिर्वहणे वीरशैवातिरिक्तानामितरेषां विरक्तानां ज्ञानिनां शूद्राणामप्यत्याश्रमित्वप्रसंग इति वाच्यं ॥ ६९ ॥ अतिवर्णाश्रमाचार इति वचनत्रयावगमितरूढत्वशालि-

---

देवाच्या मुखापासून प्रमथादिगणांच्या वंशांमध्यें उत्पन्न झाले आहेत. जे शरीरावर लिंगधारण करून जीव व शिव यांचे ऐक्य नियमानें चिंतन करतात ते संसारांतून मुक्त होतात. ( ६८ ) याप्रमाणें कामिकाद्यागम, क्रियासार ह्यांत सांगितलेल्या वेदांतसारोपनिषत् वगैरे ग्रन्थांच्या प्रमाणांवरून अतिवर्णाश्रमाचार शद्बाची रुढी वीरशैवांच्या ठिकाणीं आहे. आतां अशी एक शंका येते कीं, ज्यांनीं आश्रमधर्माचार पाळिला आहे त्यांच्या ठिकाणींच अत्याश्रमी शद्ब राहतो. वीरशैवांना वर्णाश्रमाचार नसल्यामुळें त्यांच्या ठिकाणीं अत्याश्रमी शद्ब युक्त होणार नाहीं असें ह्मणणें योग्य नाहीं. कारण परब्रह्माचे ठिकाणीं " अपहतपाप्मा " ह्या वेदानें पापाचा निषेध केला आहे. तुमच्या ह्मणण्याप्रमाणें परब्रह्माचे ठिकाणीं पापाचा संभव नसून वेदांनीं ब्रह्माचे ठिकाणीं पापाचा निषेध कसा केला? ह्यावरून वीरशैवाचे ठिकाणीं वर्णाश्रमाचाराचा संबंध नसला तरी त्याचा निषेध करितां येतो. ह्मणून वीरशैवच अत्याश्रमी आहेत असें ठरतें, अथवा शुकवामदेवाप्रमाणें पूर्वजन्मामध्यें वर्णाश्रमाचार करून त्या पुण्यानें पुनः वीरशैव झाले, नंतर ते अतिवर्णाश्रमी झाले असें ह्मटलें असतां व्याकरणशास्त्राचाही विरोध येत नाहीं. ( ६९ ) अत्याश्रमी ह्या शद्बाचें निर्वचन ह्याप्रमाणें केलें असतां वीरशैवाहून भिन्न व विरक्त असे शूद्र ज्ञानी देखील अत्याश्रमी होतील; असें ह्मणतां येत नाहीं. ( ७० ) कारण अतिवर्णाश्रमाचार ह्या शद्बाच्या यौगिकार्थाचा स्वीकार केला असतां शूद्रादिकांचे ठि-

नोऽत्याश्रमिशब्दस्य केवलयोगेन पंकजशब्दस्य तृणनीलोत्पलादाविव वृत्तेर-युक्तत्व.द्रूढिर्योगमपहरतीतिन्यायात् ॥ ७० ॥ अत एवाहीनशब्दस्य अन्हः खक्रताविति सूत्रमर्यादया अहर्गणवाचिनो द्विरात्रत्रिरात्रादिसाध्यक्रतु-परत्वमेव हीनो न भवतीत्यहीन इति योगेन वैदिकादिकश्रुत्या न क्रत्व-न्तरपरमिति"अहीनो वा प्रकरणादावित्यधिकरणे" तृतीयाध्याये पूर्वतंत्रेऽय-मेव न्यायो व्युत्पादितः ॥ तस्मादत्याश्रमिशब्दो वीरशैवेषु संभवति ।७१। यद्वा योगशक्त्यापि वीरशैवपरत्वं कल्पयितुं शक्यते ॥ तथाहि ॥ " तु हि च स्म ह वै पादपूरणे पूजने स्वति" इत्यमरकोशेन "स्वतिपूजायाम्" इतिसू-त्रेण च अतिशयिताः पूजिता वर्णाश्रमाचारा येषामिति व्युत्पत्तेः ॥ न चैता-नि वचनान्यत्याश्रमिशब्दत्वस्याथर्वणशिरोजाबालोक्तेतिकर्तव्यतापूर्वकानुष्ठे-यपाशुपतापरपर्यायभस्मरुद्राक्षधारणरूपस्य स्वात्मज्ञानपूर्वकाखिलसंस्कारप-रित्यागित्वस्य यत्किंचिज्जातीयस्य लिंगधारणादिना रहितस्य वा सहितस्य वा

---

कार्णींहि तो शद्ब संभवेल. परंतु अत्याश्रमी शद्बाच्या यौगिकार्थांचा स्वीकार न करितां केवळ रूढार्थांचा स्वीकार केला असतां अत्याश्रमी शब्द वीरशैवाखेरीज दुसऱ्या ठिका-णीं लागू शकत नाहीं. जसा पंकजशब्दाच्या केवळ यौगिकार्थांचा स्वीकार केल्यानें तो तृण व नीलकमल ह्या उभयतांच्या ठिकाणीं लावतां येतो परंतु योगरूढ्यर्थ स्वीकारि-ल्यानें कमलाव्यतिरिक्त दुसऱ्या कोणत्याही पदार्थास लावितां येत नाहीं व योगापेक्षां रूढी श्रेष्ठ आहे ह्मणून अत्याश्रमी शब्द वीरशैवांखेरीज दुसऱ्यास लावितां येणार नाहीं. ( ७१ ) " अन्हःखक्रतौ " ह्या सूत्राच्या आधारानें अहीनशब्दाचा अर्थ दिव-सांचा समुदाय असा होतो यावरून तीन चार रात्र चालणाऱ्या यज्ञालाच अहीन ह्म-णावें. केवळ योगाचा आश्रय करून इतर यज्ञाला अहीन ह्मणूं नये.हा प्रकार अहीनोवा-प्रकरणादौ ह्या अधिकरणसूत्रामध्यें तिसऱ्या अध्यायांत पूर्वतंत्रामध्यें सांगितलेला आहे. या आधारावरून वीरशैव अत्याश्रमी आहेत असें ह्मणण्याला बाध येत नाहीं. (७२) योगस्वीकार करूनही वीरशैवच अतिवर्णाश्रमी होतात; तें असें " तु हि च स्म ह वै-पादपुरणे पूजने स्वति " ह्या अमरकोशवचनानें व "स्वतिपूजायां" ह्या पाणिनीयसू-त्रानें अति शब्दाचा अर्थ पूजा असें सांगितलें आहे. दोन आधारांनीं वर्ण व आश्रम यांचे आचार ज्यांच्यामध्यें मानिलेले आहेत असा अर्थ केला असतां वीरशैवच अतिवर्णाश्रमी होतात. अथर्वशिरस, जाबाल वगैरे ग्रंथांमध्यें सांगितल्याप्रमाणें भस्म

आराध्यविप्रस्य वा उत केवलस्य वा अत्याश्रमित्वसंबंधवाचकानि संभवन्ति न केवलवीरशैवप्रतिपादकानीति वाच्यं ॥ ७२ ॥ वर्णाश्रमधर्मवतामाराध्यविप्राणामत्याश्रमिशब्दाभिधेयतायोग्यतायोग्यत्वात् परमेश्वरपंचमुखसंभूतप्रमथगणनायकघंटाकर्णगजकर्णरेणुकदारुकाविश्वकर्णगोत्रजातानां केवलातिवर्णाश्रमधर्मानुष्ठायिनां केवलवीरशैवानामेवोक्तश्रुत्यागमपुराणेष्वत्याश्रमिशब्दप्रतिपादनौचित्यात् ॥ ७३ ॥ न च प्रमथानां परमेश्वरपंचमुखसमुद्भूतानामत्यन्तान्तरंगाणां प्राकृतमनुष्यवत्प्राकृतस्त्रीपरिग्रहाभावात्कथमेषां तद्वंशजत्वं ॥ तथापि यद्यस्ति तर्हि आराध्यविप्राणामपि तद्वंशजत्वमस्तीति वाच्यम् ॥७४॥ "द्वारापोपस्पृशाद्वारापाय स्वाहा ॥ द्वाराप्युपस्पृश द्वाराप्यै स्वाहा" ॥ इतीशानबल्याख्यकर्मणि द्वारापशब्दवाच्यनंदिकेश्वरस्य

---

रुद्राक्षधारण वगैरे पाशुपतधर्म करणारे, व आत्मज्ञान मिळवून सर्व संस्कार त्याग करणारे, लिंगधारण करणारे, अथवा न करणारे कोणत्याही जातींतले लोक, व आराध्यब्राह्मण; लिंग व यज्ञोपवीत नसलेले ह्यांना अत्याश्रमी ह्मणावें असें ह्या वचनांवरून सिद्ध होतें. केवळ वीरशैवांलाच ह्मणावें असें सिद्ध होत नाहीं असें ह्मणावें तर हें ह्मणणें युक्त नाहीं. ( ७३ ) कारण परमेश्वराच्या पंचमुखापासून उत्पन्न झालेल्या घंटाकर्ण, गजकर्ण, रेणुक, दारुक, विश्वकर्ण, नामक प्रमथगणांच्या वंशांमध्यें उत्पन्न झालेले व केवळ अतिवर्णाश्रमधर्म अनुष्ठान करणारे वीरशैवच अतिवर्णाश्रमी आहेत ह्यास श्रुति, आगम, पुराण वगैरे प्रमाण आहेत. सबब आराध्यब्राह्मण अतिवर्णाश्रमी होत नाहींत. ( ७४ ) आतां ही एक शंका येते कीं, प्रमथगण परमेश्वराच्या पंचमुखापासून उत्पन्न झालेले व शिवसन्निध राहणारे असून प्राकृत मनुष्याप्रमाणें प्राकृत बायका करून घेणार नाहींत. मग वीरशैव प्रमथगणांच्या वंशांमध्यें उत्पन्न झालेले असें कसें होईल? प्रमथगणांना प्राकृत बायका नसून देखील वीरशैव प्रमथगणांच्या वंशांमध्यें उत्पन्न झाले आहेत असें ह्मणाल तर आराध्यब्राह्मणही गणवंशामध्यें उत्पन्न झालेले आहेत असें कां ह्मणूं नये? ह्या शंकेचें समाधान असें आहे कीं, ( ७५ ) "ईशानबलि" नांवाच्या कर्मामध्यें "द्वारापोपस्पृशाद्वारापाय स्वाहा" यामंत्रानें द्वाराप ह्मणजे नंदिकेश्वराला उद्देशून हवन सांगितलें आहे. आणि "द्वाराप्युपस्पृश द्वाराप्यै स्वाहा" यामंत्रानें द्वारापी ह्मणजे नंदिकेश्वराची बायको, हिला उद्देशून हवन सांगितलें आहे. नंदिकेश्वराला जर बायको नसती तर

तत्पत्न्याः सुयशादेव्याः पुराणादिषु प्रसिध्दतया विद्यमानत्वेन लोकानुग्रहार्थं परमेश्वरस्य किरातरूपादिधारणवत्प्राकृतस्त्रीपरिग्रहसंभवेन तद्वंशजत्वस्यापि केवलानां वीरशैवानां संभवादाराध्यविप्राणां तु सर्वथा तद्वंशजत्वस्यानुचितत्वात् ॥ ७५ ॥ यदि वीरशैवधर्माचरणाभिमानिनां तद्वंशजत्वमस्तीत्युच्यते चेत्तर्हि ॥ विश्वामित्रभार्गवभारद्वाजागस्त्यांगिरसवासिष्ठेत्यादिगोत्रजननिमित्तार्षत्वं न स्यात् ॥ ७६ ॥ न चेष्टापत्तिः । वृश्चिकभयात्पलायमानस्याशीविषमुखनिपतनमिव ब्राह्मणत्वस्यापि भंगः स्यात् ॥ न च ऋषिवंशजत्वं प्रमथवंशजत्वमुभयवंशजत्वमस्माकमाराध्यविप्राणां संभवतीति वाच्यं ॥ किमुत्पत्त्योभयवंशजत्वमुच्यते किं शिष्यसंप्रदायेन वा ॥ नाद्यः ॥ * * * * *

---

तिच्या नांवानें हवन कसें सांगितलें असतें. यावरून नंदिकेश्वराला बायको आहे असें सिद्ध होतें आणि कित्येक पुराणांमध्यें नंदिकेश्वराची बायको सुयशादेवी आहे. असें सांगून तिचें चरित्रही वर्णन केलें आहे. आतां प्रमथगण परमेश्वराच्या मुखापासून उत्पन्न होऊन ते नैष्ठिक व शिवसन्निध राहणारे असून त्यांनीं प्राकृत मनुष्यांप्रमाणें प्राकृत स्त्रीचा स्वीकार कसा केला? अशी एक शंका येते; परंतु तिचें समाधान असें आहे कीं, जशीं परमेश्वरानें लोकांवर उपकार करण्याकरितां किराताच्या रूपाप्रमाणें अनेक रूपें धारण केलीं त्याप्रमाणें प्रमथगणांनींहि प्राकृत स्त्रियांचा स्वीकार केला. गणांला बायका असल्यानंतर वीरशैव गणांच्या वंशांमध्यें उत्पन्न झाले आहेत असें ह्मणण्याला कांहीं बाध येत नाहीं ह्मणून वीरशैव गणवंशांमध्यें उत्पन्न झाले आहेत असें ठरलें. आराध्यब्राह्मण प्रमथगणांच्या वंशांमध्यें उत्पन्न झाले आहेत असें मुळींच ह्मणतां येत नाहीं. ( ७६ ) आतां आराध्यब्राह्मण लिंगधारणादि कांहीं वीरशैवधर्मांचें आचरण करीत असल्यामुळें ते प्रमथगणांच्या वंशांतील आहेत असें ह्मटलें तर विश्वामित्र, भार्गव, भारद्वाज, आगस्त्य, आंगिरस वासिष्ठ इत्यादि गोत्रांमुळें त्यांस प्राप्त होणारें ऋषिवंजत्व संभवणार नाहीं. ( ७७ ) कारण आराध्यब्राह्मण ऋषींच्या वंशांत जन्मले आहेत असें कबूल केल्यानें त्यांचा गणवंश नाहींसा होतो. ह्या भीतीनें आराध्यब्राह्मण ऋषींच्या वंशांत जन्मलेले नव्हेत असें ह्मटलें तर दुसरा दोष तुमच्यामागें लागेल तो येणेंप्रमाणें जसा एकादा मनुष्य विंचवाच्या भीतीनें पळाला असतां सापाच्या तोंडीं पडतो त्याप्रमाणें आराध्य-

* * * * * * * न द्वि-तीयः ॥ तादृशसंप्रदायस्य गौणतया चतुर्थवर्णस्यापि संभवात् ॥ तस्मात्केवलानां वीरशैवानां गणवंशजत्वात् ॥ ७७ ॥ कामिकागमोत्तरभागे ॥ शृणु देवि वरारोहे ममैते गणनायकाः ॥ मया नियुक्ता भूलोकं गताः सकलजातिषु ॥ ७८ ॥ संजाताश्च गणाः केचित्केचिल्लिंगेषु मूर्तिषु ॥ संभूताश्च पूर्नलिंगपूजाध्यानपरायणाः ॥ ७९ ॥ स्थापयन्तो वीर-

---

ब्राह्मण ऋषींच्या वंशांतले नव्हेत असें ह्मणाल तर ते ब्राह्मण होणार नाहींत. आतां आराध्यब्राह्मण ऋषिवंश व प्रमथगणवंश या दोन्ही वंशांमध्यें जन्मलेले आहेत असें ह्मणणें सयुक्तिक दिसत नाहीं. कारण आराध्य ब्राह्मणांचा जन्म ऋषि व प्रमथगण या दोघांच्या वंशांत आहे ह्मणून ते दोन्ही वंशांतले आहेत असे ह्मणतां किंवा त्या आराध्यब्राह्मणांनीं ऋपिवंशाचा धर्म व गणवंशाचा धर्म स्वीकारल्यामुळें शिष्यसंप्रदायांच्या संबंधामुळें ऋपि व प्रमथगण या दोघांच्या वंशांतले आहेत असें ह्मणतां? ऋपि व प्रमथगण ह्या दोघांपासून उत्पत्ति असल्यामुळें ते आराध्यब्राह्मण दोघांचेही वंशज आहेत असें ह्मणतां येत नाहीं. * * * * *
* * * * * *
* * * * * *
* * * * * *
* * * * ह्याकरितां आराध्यब्राह्मण दोन्ही वंशांतले आहेत असें ह्मणतां येणार नाहीं. आतां आराध्यब्राह्मणांनीं ऋपींचा व प्रमथगणांचा असे दोन्ही संप्रदाय घेतल्यामुळें ते दोघांच्या वंशांतले आहेत असेंही ह्मणतां येत नाहीं. धर्माच्यासंबंधानें प्रमथगणांच्या वंशांत जन्मलेले आहेत असें ह्मटलें तर ते आराध्यब्राह्मण प्रमथगणांच्या शिष्यांपैकीं एक शिष्य आहेत असें ठरतें. हा शिष्यसंप्रदाय मुख्य नसून शूद्रादिकांलादेखील संभवतो. अशा संप्रदायाच्यासंबंधानें गणवंशजपणा आराध्यब्राह्मणाला सांगत असाल तर सांगा आमची हरकत नाहीं. ह्यावरून केवळ वीरशैवच गणांच्या वंशांतले आहेत असा सिद्धांत झाला. (७८।७९) कामिकागमाच्या उत्तरभागांत सांगितलें आहे कीं, हे सुंदरी, हे गणनायक माझे आहेत; म्यां सांगितल्यावरून त्यांनीं भूलोकीं जाऊन सर्व जातींत अवतार घेतले आहेत. लिंगपूजा व शिवध्यान करणाऱ्या कांहीं गणांनीं लिंगमूर्तींत अवतार घेतले आहेत. (८०) पंचमुद्राधारण करणारे अनादि जंगमस्वरूपी व षट्स्थलज्ञानी, हे गणनायक

शैवमार्गं मोक्षप्रदं भुवि ॥ सर्वप्राणिहितार्थाय मुद्रापंचकधारिणः ॥ षट्स्थलज्ञानवन्तश्चानादिजंगममूर्तयः ॥ ८० ॥ शांकरसंहितायां ॥ वृत्तम् ॥ वत्सैते गणनायकाः क्षितितलं गत्वा नियुक्ता मया संभूतास्सकलासु जातिषु पुनर्लिंगार्चनातत्पराः ॥ संस्थाप्योत्तमवीरशैवपदवीं लोके हितार्थं नृणां मुद्राः पंच वहंत एव विचरंतस्ते समेष्यन्ति मां ॥ इति ॥८१॥ तस्मादत्याश्रमिशब्दवाच्यत्वेन सर्वोत्तमत्वं युक्तमेव ॥ अत एव पूर्वोक्तानुकूलन्यायवचनानि तेष्वेव सम्यगुपपादयितुमुचिततराणि ॥८२॥ तथाहि॥ " विशुद्धाः प्राकृताश्चेति द्विविधा मानुषाः स्मृताः ॥ शिवसंस्कारिणः शुद्धाः प्राकृता इतरे मताः ॥ ८३ ॥ वर्णाश्रमादिधर्माणां व्यवस्था हि द्विधा मता ॥ एका शिवेन निर्दिष्टा ब्रह्मणा कथिताऽपरा ॥ ८४ ॥ शिवोक्तधर्मनिष्ठा तु शिवाश्रमनिषेविणां ॥ शिवसंस्कारहीनानां धर्मः पैतामहः

---

सर्व प्राण्यांच्या हिताकरितां मोक्षसुख देणारें हें वीरशैवमत भूलोकीं स्थापिते झाले. शंकरसंहितेंत सांगितलें आहे कीं, ( ८१ ) हे वत्सा, षण्मुखा, लिंगपूजेंत तत्पर असणारे व पंचमुद्रा धारण करणारे, हे गणनायक माझ्या सांगण्यावरून भूलोकीं जाऊन सर्व जातींमध्यें अवतरतात व मनुष्याच्या हिताकरितां उत्तम वीरशैवमताची स्थापना करून पुनः माझें सान्निध्य पावतात. ह्मणून ( ८२ ) अत्याश्रमी संज्ञा येण्यानें वीरशैव सर्वांमध्यें उत्तम आहेत असें ठरलें. ह्मणून पूर्वी सांगितलेल्या शास्त्रयुक्तीला अनुसरून कित्येक वचनें वीरशैवांचें स्वरूप प्रतिपादन करणारीं आहेत. तीं वचनेंदेखिल स्पष्ट रीतीनें वीरशैवांनाच लागू पडतात. दुसऱ्यांला लागू पडत नाहींत. तीं येणेंप्रमाणें ( ८३ ) ह्या जगामध्यें मनुष्य दोन प्रकारचे आहेत एक शुद्ध व दुसरे प्राकृत. ज्यांना दीक्षा, लिंगधारण, पंचाक्षरमंत्राचा उपदेश वगैरे शिवसंस्कार झालेले आहेत ते शुद्ध ह्मणावेत ज्यांना शिवसंस्कार झाला नाहीं ते प्राकृत ह्मणावेत असें प्रमाण आहे. ( ८४ ) या प्रमाणावरून अशी एक शंका उत्पन्न होते कीं, आराध्यब्राह्मणाला दीक्षा, लिंगधारण, वगैरे शिवसंस्कार आहेत. मग शुद्ध ह्मणजे आराध्यब्राह्मणच असें कां होऊं नये ? अशी शंका आली असतां शंकेचें निवारण करण्याकरितां दुसरा श्लोक ह्मटला आहे. वर्ण व आश्रम वगैरे धर्मांची व्यवस्था दोन प्रकारची आहे. एक शिवानें सांगितलेली आहे व दुसरी ब्रह्मदेवानें सांगितली आहे. ( ८५ ) ज्यांना लिंगधारण, दीक्षा

स्मृतः ॥ ८५ ॥ तस्मात्प्राकृताऽप्राकृतधर्मभेदभिन्नमार्गतया गणवंशजानामप्राकृतानां वीरशैवानामतिवर्णाश्रमशब्दवाच्यानां पंचमाश्रमिणामनितरसाधारणसर्वातिशयत्वमुपपद्यत एवेति न कोऽपि शंकावकाशः ॥ तस्मात्तन्मतस्य सर्वोत्तमत्वं सिद्धमेव ॥ ८६ ॥ तथैव प्रमाणानि ॥ " न वीरशैवसदृशं मतमास्ति जगत्त्रये ॥ सर्वभोगप्रदं पुण्यं शिवसायुज्यदायकं ॥८७॥ यथा मत्सदृशो नास्ति पुरुषाणां त्वया समा ॥ स्त्रीणां तथा वीरशैवसदृशं नास्ति वै मतम् ॥८८॥ अपि पापशतं कृत्वा ज्ञानतोऽज्ञानतोऽपि

---

वगैरे शिवसंस्कार झालेला आहे, त्यांनीं शिवागमांत सांगितलेले शैवधर्म आचरावेत आणि त्या धर्मांवर भक्ति ठेवावी, ज्यांना शिवसंस्कार झालेला नाहीं, त्यांनीं शैवधर्म न करितां ब्रह्मदेवानें सांगितलेले वर्णाश्रमधर्म पाळावेत, याप्रमाणें वचन आहे. ( ८६ ) ह्याप्रमाणें विशुद्ध व प्राकृत अशा दोन संज्ञा दिल्यानें असें दिसून येतें कीं, ज्यांना प्रकृतीचा संबंध नसून केवळ गणवंशांमध्यें उत्पन्न झाले आहेत, ते विशुद्ध आणि जे प्रकृतीच्या सृष्टींमध्यें उत्पन्न झालेले आहेत ते प्राकृत; विशुद्धाच्या धर्माची व्यवस्था साक्षात् परमेश्वरानें आपल्या कंठापासून अठ्ठावीस आगम उत्पन्न करून केली व प्राकृतांची धर्मव्यवस्था ब्रह्मदेवानें वर्ण व आश्रम यांचा विभाग करून वेदवाणीनें सिद्ध केली असें ह्मटल्यानें असें सिद्ध होतें कीं, वीरशैवांचा धर्म ब्रह्मदेवानें निर्माण केलेल्या प्राकृत धर्मांहून वेगळा आहे. प्रकृतीचा संबंध नसून केवळ गणवंशांमध्यें वीरशैवांचा जन्म आहे. आणि वीरशैव अतिवर्णाश्रमी ह्मणवितात. ब्रह्मदेवानें सांगितलेले चार वर्ण व चार आश्रम ह्यांहून वीरशैवांचा वेगळा पांचवा वर्ण व पांचवा आश्रम आहे असें सिद्ध झालें. इतक्या गोष्टींवरून वीरशैव सर्वांमध्यें श्रेष्ठ आहेत असें ह्मणणें योग्य दिसतें. ह्यांत बिलकूल शंका नाहीं. अर्थात् वीरशैवांचें मतही सर्व मतांमध्यें उत्तम आहे असें झालें व त्याविषयीं प्रमाणेंही आहेत. तीं अशीं ( ८७ ) वीरशैवमतासारखें मत तीन्ही लोकांमध्यें नाहीं. या मताचा आश्रय करण्यानें या लोकीं सर्व सुख मिळतें व पुण्याचा संचय होऊन शेवटीं सायुज्यमुक्ति मिळते. ( ८८ ) पुरुषांमध्यें जसा माझ्यासारखा पुरुष नाहीं व स्त्रियांमध्यें जशी तुझ्यासारखी स्त्री नाहीं त्याप्रमाणें वीरशैवमतासारखें दुसरें मत नाहीं. ( ८९ ) समजून अगर न समजून शेंकडों पापें करून देखील पुरुषानें एकदां वीरशैवमताचा आश्रय केला ह्मणजे

वा ॥ वीरशैवमतं प्राप्तः शिव एव न संशयः ॥८९॥ लिंगधारणमात्रेण शिवत्वप्राप्तिकारणात् ॥ शैवं मम मतं देवि सद्योमुक्तिप्रदायकं ॥ ९० ॥ यथा नदीनां सर्वासां पुण्या भागीरथी शिवे ॥ यथैव भवती सर्वयोषितां पुरुषेष्वहं ॥ ९१ ॥ यथैत्र काशी क्षेत्राणां तीर्थेषु मणिकार्णिका ॥ मम पंचाक्षरीमंत्रः सर्वमंत्रेषु वै यथा ॥९२॥ यथैव सर्वलोकेषु कैलासस्थानमावयोः॥ वीरशैवमतं देवि मम सर्वोत्तमोत्तमम् ॥ ९३ ॥ इति पारमेश्वरवीरागमवचनैश्च पूर्वोक्तन्यायोपबृंहितश्रुत्याऽगमपुराणवचनैश्च शिवस्य श्रुतिस्मृतिपुराणन्यायसिद्धसर्वदेवोत्तमत्ववद्वीरशैवमतस्य सर्वातिशयत्वं सिद्धं ॥९४॥ तन्मतनिष्ठजात्याश्रमाचारभेदेन सामान्यवीरशैवो विशेषवीरशैवो निराभारवीरशैवश्चेति त्रिविधः ॥ तत्तल्लक्षणानां तु क्रियासारवीरशैवाचारकौस्तुभवीरशैवानंदचंद्रिकादिषु विस्तारेणोक्तत्वात्तदनुगतसंप्रदायसिद्धतया विचार्यमाणे क्षत्रियवैश्यादयो लिंगिनः सामान्यवीरशैवा भक्तमाहेश्वरा-

---

तो साक्षात् शिवरूपी होतो ह्यांत संशय नाहीं. ( ९० ) हे पार्वती, हें वीरशैवमत तात्काळ मुक्ति देणारें आहे; कारण लिंगधारण केल्याबरोबर मनुष्य शिवरूपीच होतो. ( ९१ ) सर्व नद्यांमध्यें जशी भागीरथी श्रेष्ठ आहे; सर्व स्त्रियांमध्यें जशी तूं श्रेष्ठ आहेस; सर्व पुरुषांमध्यें जसा मी पूज्य आहे; ( ९२ ) सर्व क्षेत्रांमध्यें जशी काशी मान्य आहे; सर्व तीर्थांमध्यें जशी मणिकर्णिका पवित्र आहे; सर्व मंत्रांमध्यें पंचाक्षरमंत्र जसा श्लाघ्य आहे ( ९३ ) व सर्व लोकांमध्यें आपला कैलास जसा श्रेष्ठ आहे; त्याप्रमाणें सर्व मतांमध्यें माझें वीरशैवमत अतिशय श्रेष्ठ आहे. ( ९४ ) याप्रमाणें पारमेश्वर व वीरागम ह्या आगमवचनांवरून व परमेश्वरानें सर्व पुरुषांमध्यें मी जसा श्रेष्ठ आहे त्याप्रमाणें वीरशैवमत श्रेष्ठ आहे असें आपले सादृश्य वीरशैवमताला दिल्यानें श्रुति, स्मृति, आगम, वगैरे प्रमाणांवरून, परमेश्वर सर्वोत्तम आहे, हें ह्मणणें जसें निर्विवाद आहे. तसें वीरशैवमतही सर्वांत उत्तम आहे असें ह्मणणें निर्विवाद आहे. ( ९५ ) या मतांमध्यें जातीवरून आश्रमांवरून व आचारावरून वीरशैवांमध्यें सामान्यवीरशैव, विशेषवीरशैव निराभारवीरशैव ह्मणून तीन प्रकार आहेत. प्रत्येक वीरशैवाचें लक्षण क्रियासार, वीरशैवाचारकौस्तुभ, वीरशैवानंदचंद्रिका, वगैरे ग्रन्थांमध्यें विस्तारानें सांगितल्यामुळें त्या ग्रन्थांचा साधारण आशय मनांत आणून त्या त्या वीरशैवांचें स्वरूप

राध्याभिधब्राह्मणा लिंगधारिणो विशेषवीरशैवाः लिंगांगिब्राह्मणयतिनो निराभारा इति निर्मीयते ॥ ९५ ॥ अत एव ॥ गुरुक्तेनैव मार्गेण भूतिरुद्राक्षधारणं ॥ पंचाक्षरीजपं देवि कुर्यान्नित्यमतंद्रितः ॥ ९६ ॥ गुरुणा दत्तलिंगं तु सावधानेन धारयेत् ॥ इष्टलिंगं प्राणलिंगं भावलिंगं च पार्वति ॥ एकीकृत्याऽर्चनं कुर्याद्वीरशैवो न भेदतः ॥ ९७ ॥ इति वचनैः सामान्यवीरशैवलक्षणप्रातिपादनात् ॥ ९८ ॥ आत्मानं वा सुतान्वाऽपि भूषणानि धनानि वा ॥ यत्स्वकीयमभिप्रीतं तत्कुर्याज्जंगमार्पितम् ॥ ९९ ॥ अनुभूतं च तैः पश्चादादाय स्वयमात्मसात् ॥ कुर्यात्प्रसादबुध्या यः स विशेष इति स्मृतः ॥ १०० ॥ इति वचनैर्विशेषवीरशैवलक्षणप्रतिपादनात् ॥ १०१ ॥ जटी मुण्डी शिखी वापि काषायवसनान्वितः ॥ निस्पृहो निजलिंगैक्यो भिक्षाशी भयवर्जितः ॥ १०२ ॥ मौनी भूतदयायुक्तो निराभार इति स्मृतः॥

---

संक्षिप्त रीतीनें सांगतों. लिंगधारण करणाऱ्या क्षत्रिय व वैश्य इत्यादींस सामान्यवीरशैव ह्मणावें. लिंगधारण करणारे भक्त माहेश्वर ब्राह्मण विशेषवीरशैव होत. लिंगी ब्राह्मणांतील संन्यासी निराभारवीरशैव होत, याप्रमाणें वीरशैवांचा निर्णय आहे. ( ९६ ) ह्मणून वीरशैवानें हे पार्वती गुरूनें सांगितलेल्या रीतीनें आळस न करितां नेहमीं भस्म व रुद्राक्ष धारण करून पंचाक्षरी मंत्राचा जप करावा; ( ९७ ) गुरूनें दिलेलें लिंग लक्षपूर्वक धारण करावें. इष्टलिंग, प्राणलिंग, भावलिंग ह्या तीन्ही लिंगांचें एकीकरण करून ( एकच आहेत असें समजून ) वीरशैवानें भेद न मानितां त्यांचें पूजन करावें. ( ९८ ) ह्याप्रमाणें सामान्यवीरशैवांचें लक्षण सांगितलें असल्यामुळें ( ९९ ) तसेंच विशेषवीरशैवानें आपलें स्वतःचें शरीर, पुत्र, भूषणें, धन हीं जंगमास अर्पण करावींत. सारांश जें जें ह्मणून आपणांस प्रिय असेल तें जंगमास अर्पण करावें. ( १०० ) पूर्वोक्त वस्तूंचा उपभोग जंगमानें घेतल्यानंतर आपण प्रसाद ह्मणून त्यांचा स्वीकार करावा. असें करणाऱ्यास विशेषवीरशैव असें ह्मणतात.( १०१ ) अशाप्रकारचें विशेषवीरशैवाचें लक्षण सांगितलें आहे. ( १०२ ) निराभारीनें जटा वाढवाव्या किंवा सर्व केशांचें मुंडन करावें अथवा भगवें वस्त्र परिधान करावें, भिक्षान्नावर निर्वाह करावा, व निर्भय होऊन इष्टलिंगाचें चिंतन करीत निस्पृहपणें जगांत संचार करावा. ( १०३ ) मौन धारण करावें, प्राणिमात्रांवर दया करावी; अंगांत कफनी घा-

कंथाकमण्डलुधरो भूतिरुद्राक्षसंयुतः ॥ दण्डकौपीनधारी च निराभार इति स्मृतः॥१०३॥ इति सूक्ष्मतंत्रादिवचनैर्निराभारवीरशैवलक्षणप्रतिपादनात्॥ सामान्यविशेषवीरशैवापेक्षया चरजंगमादिशब्दवाच्यो निराभारवीरशैवो देशिकोत्तमः ॥ विरक्ततया सर्वोत्तम इति निर्विवादः ॥ १०४ ॥ किंच ॥ शिवरहस्ये ॥ “ लिंगं स्यादिष्टरूपं तु जंगमः प्राणलिंगकं ॥ भावलिंगं गुरुः प्रोक्तस्त्रिविधं त्वेकमुच्यते ॥ १०५ ॥ कारणागमे ॥ जानीयात्सच्चिदानंद-देशिकोत्तमजंगमात् ॥ नित्यं पूर्णात्प्रसादं वा स्वात्मभावेन भावयेत् ।१०६। वीरागमे ॥ जंगमो गुरुलिंगे च त्रिविधं त्वेकमुच्यते ॥ प्रसादो मुक्ति-मूलं च प्रसादो लिंगमुच्यते ॥ १०७ ॥ सिद्धांतशिखामणौ ॥ एक एव शिवः साक्षात्सर्वानुग्राहकः प्रभुः ॥ गुरुजंगमलिंगात्मा वर्तते भुक्तिमु-क्तिदः ॥ १०८ ॥ इत्यादिवचनैर्गुरुलिंगजंगमानां सच्चिदानन्दस्वरूपाणां

---

लून हातांत दंड व कमंडलु घेऊन व लंगोटी घालून भस्म रुद्राक्ष धारण करावें. अशा रीतीनें राहणाऱ्यास निराभारवीरशैव असें ह्मणतात. ( १०४ ) ह्या सूक्ष्मागम वगैरे ग्रंथांच्या वचनांवरून व याप्रमाणें निराभारवीरशैवाचें लक्षण सांगितल्यामुळें सामान्य विशेषवीरशैवांपेक्षां चर, जंगम वगैरे शब्दांनीं निर्दिष्ट केलेला निराभारवीरशैव देशिकोत्तमच विरक्त असल्यामुळें सर्वांमध्यें निःसंशय उत्तम आहे. ह्यास पुढील दुसरें प्रमाण आहे. शिवरहस्यांत सांगितलें आहे कीं, ( १०५ ) वीरशैव गळ्या-मध्यें जें लिंग धारण करतात तें इष्टलिंग होय; जंगम हा प्राणलिंग आहे. गुरूला भावलिंग ह्मणावें. हे तिघेहि एकच आहेत, कारणागमांत सांगितलें आहे कीं, ( १०६ ) सच्चिदानंद व ज्ञानपरिपूर्ण अशा जंगम देशिकोत्तमाकडून नेहमीं प्रसाद-स्वरूप जाणावें व त्याच्या प्रसादास आत्मवत् समजावें. ह्याविषयीं वीरागमांत असें प्रमाण आहे कीं, ( १०७ ) लिंग, जंगम, आणि गुरु, हे तिघेहि एकच आहेत, असें समजावें. यांचा प्रसाद ग्रहण केल्यानें भक्तास मुक्ति प्राप्त होते. याकरितां प्रसाद ह्मणजे साक्षात् लिंगच आहे, असें शास्त्र सांगतें. आणि सिद्धांत-शिखामणिमध्येंही असेंच सांगितलें आहे कीं, ( १०८ ) परमेश्वर एक असून जगावर अनुग्रह करण्यासाठीं गुरु, जंगम, व लिंग या तिघांचें रूप धारण करून उपासकाला भुक्ति व मुक्ति ( भोग व मोक्ष ) देतो. ( १०९ ) इत्यादि वचनां-वरून ज्याप्रमाणें सत्, चित्, व आनंद, ह्या तीन लक्षणांनीं युक्त असलेलें परब्रह्म,

यथा ब्रह्मणः सच्चिदानन्दस्वरूपलक्षणलक्षितस्य व्यवहारदृष्ट्या सत्वेन चित्वेन आनंदत्वेन भिन्नत्वेऽपि परस्परस्वरूपेण यथाऽभेदोंऽगीक्रियते तद्व-द्गुरुलिंगजंगमानां भिन्नत्वेऽपि शास्त्रमर्यादया तत्त्वतश्चैक्यमेव सिद्धं भ-वति ॥ १०९ ॥ किंच ॥ तत्स्वरूपस्य त्रैकालिकाबाध्यतारूपसद्रूपस्याधिक्यं॥ इत्थंचेदपि चिद्रूपस्य स्वप्रकाशस्य सर्वप्रार्थनीयत्वाभावेन परमप्रेमास्पद-त्वाभावेन च तदुभयरूपयोरानंदस्वरूप एव विद्यमानत्वेन तस्य तथैव चरतत्वस्य सर्वाभ्यर्हितत्वं ॥ ११० ॥ तथाहि ॥ सिद्धांतशिखामणौ ॥ लिंगं च द्विविधं प्रोक्तं जंगमाजंगमात्मना ॥ अजंगमं तु यल्लिंगं मृच्छिलादि-विनिर्मितं ॥ १११ ॥ तद्वरं जंगमं लिंगं शिवयोगीति विश्रुतं ॥ लिंगं च जंगमं चैवं तदाधिक्यं वदामि ते ॥ जंगमं ज्ञानरूपं तु क्रियारूपं तु लिं-

---

सत् चित् व आनंद हीं तीन लक्षणें असल्यामुळें व्यवहारांत भिन्न असतांही परस्पर स्वरूपानें एकच आहे असें मानिलें जातें तसेंच सच्चिदानंदस्वरूपी असलेले गुरु लिंग, व जंगम हे व्यवहारांत भिन्न असूनही शास्त्रमर्यादेनें वस्तुतः एकच आहेत असें सिद्ध होतें. ( ११० ) त्यांतही सूक्ष्म विचार केला असतां लिंगापेक्षां जंगमाची योग्यता अधिक आहे. हें कसें ह्मणाल तर परब्रह्माचीं सत् चित् आनंद ह्मणून तीन रूपें आहेत. त्यांमध्यें सत् नामकरूप भूत भविष्य, वर्तमान या तिन्ही कालांमध्यें एकसारखें राहत असल्यामुळें श्रेष्ठ आहे. तथापि चिन्नामकरूप स्वयंप्रकाश असल्या-मुळें कमी योग्यतेच्या मनुष्याला प्रार्थना करण्याजोगें नाहीं व सत् नामकरूप ज्ञानी लोकांनीं चिंतन करण्यास योग्य असल्यामुळें अज्ञान लोकांची त्यावर प्रीति बसत नाहीं. आनंदरूप हें सर्वांना प्रार्थना करण्यास योग्य असून सर्वांच्या प्रीतीस पात्र आहे. ह्मणून आनंदस्वरूप जसें तिन्हींमध्यें श्रेष्ठ आहे; त्याप्रमाणें लिंगापेक्षां जंगम श्रेष्ठ आहे. याविषयीं सिद्धांतशिखामणींत सांगितलें आहे कीं, ( १११ ) जंगम आणि स्थावर ह्मणून लिंगामध्यें दोन प्रकार आहेत. मातीचें किंवा दगडाचें केलेलें जें स्थापित लिंग तें स्थावरलिंग. ( ११२ ) शिवयोगी ह्या नांवानें प्रसिद्ध असलेलें जें लिंग तें जंगमलिंग होय. तें पूर्वोक्त स्थावरलिंगाहून श्रेष्ठ आहे. हे अगस्त्य लिंगापेक्षां जंगमाला श्रेष्ठत्व येण्यास कारण काय? असें ह्मणशील तर ऐक. जंगम हा ज्ञानरूपी आहे. व लिंग हें क्रियारूप आहे; क्रियेपेक्षां ज्ञानाची योग्यता जास्त असल्यामुळें ज्ञानरूपी जंगम क्रियारूप लिंगापेक्षां श्रेष्ठ

गकं ॥ ११२ ॥ स्वायंभुवागमे ॥ लिंगद्वयं समाख्यातं चरंचाचरमेवच ॥ चरं त्वतिथिरूपं स्यादचरं पार्थिवादिकं ॥ ११३ ॥ चरे सदा वसत्येव प्रीतियुक्तो महेश्वरः ॥ अचरे मंत्रसंस्कारैः स्वयंस्तिष्ठन्सदाशिवः ॥११४॥ शिवधर्मशास्त्रे॥पदं देह इति ख्यातं पदार्थः प्राण एव च ॥ उभयोरन्तरं यद्व-त्तद्वत्स्याल्लिंगजंगमे ॥ ११५ ॥ शिवरहस्येऽपि ॥ चरे सदा वसत्येव प्रीति-युक्तो महेश्वरः ॥ अचरे मंत्रसंस्कारैर्ज्ञेयो नित्यं महेश्वरः ॥ ११६ ॥ स्था-वरं जंगमं चेति द्विविधं लिंगमुच्यते ॥ जंगमस्यावमानेन स्थावरं नि-ष्फलं भवेत् ॥ ११७ ॥ शैवरत्नाकरे ॥ लिंगक्षेत्रं गुरुस्थानं गुरुक्षेत्रं तु जंगमः ॥ जंगमस्तु निराभारो भाराभारविवर्जितः ॥ ११८ ॥ इत्यादि सिद्धांतशिखामणिस्वायंभुवागमशिवधर्मशास्त्रशिवरहस्यादिवचनैश्चराचररू-पस्य द्विविधस्य लिंगस्य मध्ये मंत्रसंस्कारायत्तमहिमस्थिरलिंगापेक्षया चर-

---

आहे. याबद्दल स्वायंभुवागमांत सांगितलें आहे कीं, ( ११३ ) चर, व अचर, अशीं दोन लिंगें आहेत. अतिथि हा चरलिंग आहे. पार्थिवलिंग तें अचरलिंग ह्मणावें. ( ११४ ) चरलिंगामध्यें महादेव नेहमीं प्रीतीनें असतो. अचरलिंगामध्यें मंत्रादिकांनीं संस्कार झाला असतां शंकर नित्य राहतो. ह्याकरितां स्थावर-लिंगापेक्षां चरलिंग श्रेष्ठ आहे. शिवधर्मशास्त्रांत सांगितलें आहे कीं, ( ११५ ) पदास देह असें ह्मणतात व पदार्थास प्राण असें ह्मणतात ह्या पदपदार्थांमध्यें जसें अंतर [ भेद ] आहे तसेंच लिंग व जंगम यांत आहे. [ ह्मणजे क्रियारूपलिंगाला ज्ञान-रूपी जंगम चैतन्य आहे असें समजावें. ] शिवरहस्यांत सांगितलें आहे कीं, ( ११६ ) चरलिंगांत महादेव नेहमी प्रीतीनें राहतो व स्थावरलिंगास मंत्रसंस्कार झाला असतां त्यांत सदाशिव वास्तव्य करितो. (११७) ह्याकरितां स्थावर व जंगम अशीं दोन प्रकारचीं लिंगें आहेत. स्थावरलिंगाची पूजा करून जंगमलिंगाचा अप-मान केला असतां स्थावरलिंगाची केलेली पूजा निष्फळ होते. शैवरत्नाकरामध्यें देखील सांगितलें आहे कीं, ( ११८ ) लिंगक्षेत्र हें गुरुस्थान आहे गुरुक्षेत्र जंगम-स्थल आहे. याकरितां ज्यानें प्रपंचाचा सर्व भार टाकून दिला आहे तो निरा-भारीच जंगम होय. ( ११९ ) सिद्धांतशिखामणि, स्वायंभुवागम, शिवधर्मशास्त्र, शिवरहस्य वगैरे ग्रंथांतील वचनांवरून असें सिद्ध होते कीं, चर व अचर अशीं दोन प्रकारचीं लिंगें आहेत. या दोन्ही लिंगांमध्यें परमेश्वराचें सन्निधान असतें

## चरलिंगस्य सर्वाधिकत्वकथनम्. (२८)

लिंगस्य सार्वकालिकषट्स्थलज्ञानसंपन्नस्य जंगमशब्दाभिधेयस्य स्थिरलिंगापेक्षयाऽऽधिक्यं सिद्धमेव ॥ ११९ ॥ अत एवारग्वधे च विल्वे च लिंगे च गुरुविग्रहे ॥ शिवयोगिशरीरे च सदा सन्निहितः शिवः ॥१२०॥ इति ॥ यदेको ब्रह्मविद्भुंक्ते जगत्तर्पयतेऽखिलं ॥ इत्यादिवचनानि ज्ञानिनश्चरलिंगस्याधिक्यप्रतिपादकानि बहूनि संगच्छंते ॥ १२१ ॥ वैद्यशास्त्रे ॥ इतिहासपुराणेषु शिवस्याप्यतिथिर्गुरुः ॥ अतिथेः पादसलिलमधिकं हि जगत्त्रये ॥ १२२ ॥ वीरागमे ॥ जंगमस्य प्रसादान्नं नैवेद्यार्थं प्रकल्पयेत् ॥ पदांबुजजलस्नानमधिकं हि मयोच्यते ॥ १२३ ॥ पारमेश्वरे ॥ पादाभिषेकसलिले लिंगमज्जनमुत्तमं ॥ तत्प्रसादश्च नैवेद्यं तथा मुक्तिफलं ध्रुवं॥१२४॥ ब्रह्माण्डपुराणे ॥ जंगमानां पादतीर्थे लिंगमज्जनमुत्तमं ॥ तत्प्रसादान्महा-

---

त्यांत इतकेंच अंतर आहे कीं, मंत्राचा संस्कार झाल्यानंतर अचरलिंगामध्यें परमेश्वराचें संनिधान होतें, चरलिंगामध्यें परमेश्वराचें संनिधान सदा असतें. याकरितां स्थावरलिंगापेक्षां जो षट्स्थलज्ञानसंपन्न निराभार चरलिंगरूपी जंगम, तो अधिक आहे, असें सिद्ध झालें. आणखी दुसऱ्या ग्रन्थामध्यें असें सांगितलें आहे कीं, (१२०) आरग्वध [ बाहव्याच्या ] वृक्षामध्यें, बिल्ववृक्षामध्यें, लिंगामध्यें, गुरुच्या देहामध्यें,शिवयोग्याच्या शरीरामध्यें,शिवाचें सदा सान्निध्य असतें. (१२१)याप्रमाणें सांगून पुनः षट्स्थलज्ञानसंपन्नाचें विशेष वर्णन केलें आहे; तें येणेंप्रमाणें जर एक षट्स्थलज्ञानसंपन्न शिवयोगी एकाद्याच्या घरामध्यें भोजन करील तर त्या गृहस्थाला सगळ्या जगाला अन्न देण्याचें श्रेय प्राप्त होतें. याप्रमाणें षट्स्थलज्ञानी चरमूर्तीचें आधिक्यप्रतिपादन करणारीं पुष्कळ वचनें आहेत. ( १२२ ) याबद्दल दुसरींही वैद्यशास्त्रामध्यें प्रमाणें आहेत. तीं अशीं—इतिहास व पुराणें यांमध्यें असें सांगितलें आहे कीं, अतिथि ह्मणजे जंगम शिवाचा देखील गुरु आहे. जंगमाचें पाय धुतलेलें पाणी तिन्ही लोकांत अधिक आहे. वीरागमांत असें सांगितलें आहे कीं, ( १२३ ) जंगमाच्या प्रसादाच्या अन्नानें इष्टलिंगाला नैवेद्य करावा. जंगमाच्या पादोदकानें केलेला अभिषेक लिंगाला अधिक प्रिय आहे. पारमेश्वरागमांत सांगितलें आहे कीं, ( १२४ ) जंगमाच्या पादप्रक्षालनाच्या उदकानें लिंगाला अभिषेक केल्यापासून व जंगमाच्या प्रसादाचें अन्न नैवेद्य दाखविल्यानें खरोखर मुक्ति होते. ब्रह्मांडपुराणामध्यें असें सांगितलें आहे कीं, ( १२५ ) जंगमाच्या पायाच्या तीर्थानें लिंगाला स्नान घालणें उत्तम आहे. जंगमलिंगाचा प्रसाद घे-

देवि नैवेद्यं शुभदं स्मृतं ॥ १२५ ॥ तस्माज्जंगमलिंगस्य प्रसादेन सम-र्पणं ॥ अभिषेकजलस्नानं विशेषो नाम कथ्यते ॥ १२६ ॥ इत्यादिवैद्यशास्त्रवीरागमपारमेश्वरब्रह्माण्डपुराणादिवचनैर्लिंगस्य जंगमपादोदकस्नानतत्प्रसादसमर्पणप्रतिपादनाल्लिंगापेक्षया जंगमस्याधिक्यं सिद्धमेव ॥१२७॥ ननु ॥ इष्टलिंगपूजाप्रकरण एषां वचनानां श्रूयमाणत्वादिष्टलिंग एव चरणपादोदकमज्जनं तत्प्रसादनिवेदनं च प्रकरणात्प्राप्तम् ॥ न तु स्थिरलिंगे ॥ अप्राकृतत्वादिति चेन्न ॥ १२८ ॥ स्थिरलिंगार्चको मर्त्यो न शुद्धः पंक्तिकर्मसु ॥ धृतलिंगार्चको मर्त्यः पावनः पंक्तिकर्मसु ॥ १२९ ॥ चितिं च चितिकाष्ठं च यूपं चाण्डालमेव च ॥ स्पृष्ट्वा देवलकं चैव सवासा जलमाविशेत् ॥ १३० ॥ त्रिवर्षं देवतापूजामन्यार्थं यः करिष्यति ॥ स वै देवलको नाम सर्वकर्मबहिष्कृतः ॥ १३१ ॥ इत्यादिवचनैः स्थिरलिंगार्चकस्य दे-

---

ऊन इष्टलिंगाला नैवेद्य दाखविणें कल्याणदायक आहे. ( १२६ ) ह्मणून जंगमलिंगाच्या प्रसादानें इष्टलिंगाला नैवेद्य समर्पण करावा तसेंच त्याच्या पादोदकानें इष्टलिंगाला स्नान घालणें हा विशेष आहे. ( १२७ ) इत्यादि वैद्यशास्त्र, वीरागम, पारमेश्वरागम, ब्रह्मांड वगैरे पुराणांतील वचनांवरून लिंगाला जंगमाच्या पादोदकानें स्नान घालावें व त्याच्या प्रसादानें नैवेद्य समर्पण करावा असें सांगितल्यावरून लिंगापेक्षां जंगम अधिक आहे असें शास्त्रानें सिद्ध झालें.(१२८)ह्यावर अशी शंका येते कीं, वर सांगितलेलीं सर्व वचनें इष्टलिंगाच्या पूजेच्या प्रकरणामध्येंच आहेत. सबब पादोदकानें स्नान, व जंगमाच्या प्रसादाचा नैवेद्य हीं इष्टलिंगालाच सांगितलीं आहेत, स्थिरलिंगाला सांगितलेलीं नाहींत असें ह्मणतां येत नाहीं. ( १२९ ) कारण स्थापितलिंगाची पूजा करणाऱ्या मनुष्यास भोजनाच्या पंक्तींत घेऊं नये, कारण तो शुद्ध नाहीं. कंठामध्यें धारण केलेल्या इष्टलिंगाची पूजा करणाऱ्या मनुष्यास पंक्तींत घेतल्यानें ती पंक्ति शुद्ध होते. ( १३० ) चितेला, चितेच्या लांकडाला, यज्ञाच्या खांबाला, चांडालाला आणि पुजाऱ्याला स्पर्श केला असतां वस्त्रासकट पाण्यामध्यें जाऊन स्नान करावें. ( १३१ ) जो मनुष्य पगार घेऊन दुसऱ्याकरितां स्थापित देवतेची पूजा तीन वर्षें करतो, त्यास देवलक ह्मणावें. तो कोणत्याही कर्माला योग्य नाहीं. ( १३२ ) इत्यादि वचनांवरून देवलक शब्द स्थिरलिंगाची पूजा करणाऱ्याचा वाचक असल्यामुळें त्याचा

वलकशब्दवाच्यतया सहवाससहपंक्तिभोजनास्पृशत्वादिसर्वकर्मवहिष्कृतत्वप्रतिपादनाद्धृतलिंगस्य वीरमाहेश्वरस्य सहवाससहपंक्तिभोजनादेस्तथा दर्शनात् ॥ पावित्र्यादुत्कृष्टत्वप्रतिपादनाच्चेष्टलिंगास्थिरलिंगपूजाकर्तृणामुत्कर्षापकर्षप्रतिपादनादिष्टलिंगस्थिरलिंगयोः क्रमेणोत्कर्षापकर्षौ निश्चितव्यौ।१३२। तथाच ॥जंगमस्य सर्वाभ्यर्हितत्वाल्लिंगप्राणरूपत्वाच्च स्थिरलिंगापेक्षया प्राप्तोत्कर्ष इष्टलिंगेऽपि जंगमपादोदकप्रसादसमर्पणपदविन्यासादिविधानात् ॥ तदपेक्षया पूजापकर्षायत्तापकर्षशालिनि स्थिरलिंगजंगमपादविन्यासादि कैमुतिकन्यायसिद्धं ॥१३३॥ एतदर्थानुसारीणि वचनानि ॥ लिंगांगी च मम प्राणो लिंगांगी च मम प्रभुः ॥ लिंगांगी मामको जीवो लिंगांगी मम रक्षकः ॥ १३४ ॥ लिंगांगी मम कर्ता च लिंगांगी स च मद्गुरुः ॥ परमाद्वैतविज्ञाननिष्ठा यस्य महात्मनः ॥ शुश्रूषा क्रियते येन तत्पादो मम मस्तके ॥ १३५ ॥ निरपेक्षं मुनिं शान्तं निर्वैरं समदर्शिनं ॥

---

सहवास करूं नये व त्यास पंक्तींत घेऊन जेवूं नये. याप्रमाणें त्यास सर्व कर्मांत बहिष्कार सांगून इष्टलिंग धारण करणाऱ्या वीरमाहेश्वराबरोबर सहवास, व पंक्ति भोजन करण्यास सांगितल्यानें इष्टलिंगाचे ठिकाणीं पावित्र्य व उत्कृष्टता हीं येतात, ह्मणून इष्टलिंगाची पूजा करणारा श्रेष्ठ असून स्थिरलिंगाची पूजा करणारा अधम आहे, असें सिद्ध केल्यानें इष्टलिंग व स्थावरलिंग यांचे ठिकाणीं क्रमानें उत्कर्ष [ श्रेष्ठत्व ] अपकर्ष [ नीचत्व ] अर्थात् निश्चित झालें. ( १३३ ) लिंगापेक्षां जंगम श्रेष्ठ आहे, असें वर सांगितलें. यास कारण हेंच कीं, जंगम हा लिंगाचा प्राण आहे. या कारणास्तव जंगमाच्या पादोदकानें स्थिरलिंगापेक्षां श्रेष्ठ असलेल्या इष्टलिंगाला अभिषेक करणें व लिंगावर जंगमाचे पाय ठेवणें वगैरे सर्व कृत्यें सशास्त्र आहेत. असें सिद्ध झालें. ( १३४ ) याविषयीं प्रमाणें आहेत तीं येणेंप्रमाणें—कंठामध्यें लिंग धारण करणारा वीरशैव माझा प्राण असून माझा प्रभु आहे लिंगांगी मनुष्य माझा जीव असून तो माझें रक्षण करणारा आहे. ( १३५ ) लिंगांगी मनुष्य माझा कर्ता असून माझा सद्गुरु आहे. जीव व परमेश्वर या दोघांच्या अद्वैत ज्ञानाचे ठिकाणीं ज्याची निष्ठा आहे अशा त्या महात्म्याची सेवा जो करतो, त्याचे पाय माझ्या मस्तकावर असावेत. ( १३६ ) ज्याला विषयाची इच्छा राहींशीं झालेली आहे, आणि ज्यानें राग द्वेष जिंकून वैर टाकून प्राणिमात्रांवर

अनुव्रजाम्यहं देवि पूरयत्यंघ्रिरेणुभिः ॥ १३६ ॥ वीरागमे ॥ सर्वप्राणिहिता-
र्थाय मुद्रापंचकधारिणः ॥ षट्स्थलज्ञानवन्तश्चानादिजंगममूर्तयः ॥१३७॥
त एव स्वं स्वं पदाब्जं निधाय मम मस्तके ॥ दत्वा पादोदकं मह्यं प्रसादं
मेनकात्मजे ॥ १३८ ॥ कुर्वन्ति वै पवित्रं मामन्तेऽप्येष्यन्ति माममी ॥
भक्तिर्मम प्रिया देवि भक्तः प्राणो ममैव तु ॥ मत्तोऽधिको हि मद्भक्तस्तस्मा-
द्भक्तं नमाम्यहं ॥ १३९ ॥ इत्याद्यागमवाक्योक्तं तांत्रिकं वैदिकं न चेत् ॥
त्रिपादूर्ध्वं उदैन्मंत्र अस्मिन्नर्थे प्रवर्तते ॥१४०॥ त्रिपादिति त्रयः पादा यस्य
तस्मात्त्रिपाच्छिवः ॥ गुरुर्लिंगं जंगमं च तेषां पादत्रयस्त्रिपात् ॥१४१॥ ऊर्ध्वं-
उत्कृष्ट एवासावुदैदुदितवांछिवः ॥ पुरुषो वै रुद्र इति पुरुषत्वं शिवस्य तत्
॥ १४२ ॥ पादोऽस्येह शिवस्यैव लब्धो यद्यभवत्पुनः ॥ पुनःशब्दो विशे-
षार्थवाची वैशेष्यमत्रच ॥ १४३ ॥ " असांनिध्यं जंगमस्य गुरोश्च प-

---

सारखी दृष्टि ठेविलेली आहे त्या मुनीच्या मागून मी चालत असतों. कारण तो आपल्या पायाच्या धुळीनें मला पवित्र करितो. वीरागमामध्यें असें सांगितलें आहे कीं, ( १३७ ) जे जंगम पंचमुद्राधारण करून षट्स्थलज्ञान मिळवून सगळ्या प्राण्यांच्या कल्याणासाठीं जगांत संचार करतात. ( १३८।१३९ ) ते अनादिजंगम माझ्या मस्तकावर पाय ठेवून मला पादोदक देऊन मजवर प्रसाद करून मला पवित्र करितात व शेवटीं ते कैलासामध्यें येऊन माझ्या संनिध राहतात. ईश्वर ह्मणतात. हे पार्वति, भक्ति मला प्रिय असून भक्त माझा प्राणच आहे. तो माझा भक्त माझ्यापेक्षां अधिक आहे ह्मणून मी त्याला वारंवार नमस्कार करितों. ( १४० ) वर सांगितलेलें सर्व प्रकरण आगमांत सांगितल्यामुळें वेदाला विरुद्ध आहे अशी शंका आली तर वेदाचें प्रमाण सांगतात. " त्रिपादूर्ध्वं उदैत्पुरुषः " या मंत्राचा अर्थ आगमाच्या अर्थाला अनुसरून आहे. ( १४१।१४२ ) कसें ह्मणाल तर त्रिपात् ह्मणजे तीन अंश ज्याचे आहेत, तो त्रिपात् ह्मणजे शिव होय. गुरु, लिंग जंगम ह्मणून तीन अंश ज्याचे आहेत, तो त्रिपात्परमेश्वर सर्वोत्तम असून जगाच्या कल्यासाठीं या जगामध्यें गुरु, लिंग, जंगम यांच्या स्वरूपानें प्रकट होऊन तो शिव आपणास रुद्रपुरुष ह्मणवून घेत आहे. ( १४३।१४४ ) शिवाच्या या तीन पादांपैकीं गुरु, जंगम हे नसून केवळ लिंग असलें तरी त्याचा एक पाद मिळाला तरी बरा. याप्रसंगीं इष्टलिंगाचे ठिकाणीं गुरु व जंगम यांची कल्पना

तितस्तथा ॥ विश्वं व्याक्रामदित्येवं व्यापकत्वं शिवस्य च ॥ १४४ ॥ अनुसंधाय मनसा गुरुजंगमतामपि ॥ अशनानशने चोभे संभवे चाशनं भवेत् ॥ ॥ १४५ ॥ अत्तुं योग्यं भवेत्तत्र त्रयं यन्न लभ्यते ॥ तदात्वनशनं प्रोक्तमदं पातित्वमश्नुते ॥ १४६ ॥ त्रिपादमात्रमंत्रेऽस्मिन् त्रिपादोदकधारणं ॥ इति चेत्तत्र मंत्रान्ते साशनानशने उभे ॥ १४७ ॥ गुरुलिंगचराणां च पादत्रयमनूद्य च ॥ विहिते तत्र भेदश्च द्वयोरेकस्य संभवे ॥ १४८ ॥ वचनांतरसिद्धार्थाः संधेयास्तत्र तानि तु ॥ प्राणलिंगपरो भक्तो लब्ध्वा तत्र पदोदकं ॥ गुरुजंगमपादोदं लब्धवानेव भक्तितः ॥ १४९ ॥ समवाये गुरोस्तत्र गुरोर्लब्ध्वा पदोदकं ॥ पादोदकं जंगमस्य लब्धवान् मनसैव तम् ॥१५०॥ गुरुलिंगचराणां च समवाये तु भक्तिमान् ॥ पादोदकं चराल्लब्ध्वा गुरोर्लिंगस्य भक्तिमान् ॥१५१॥ अश्नीयादशनं भक्तेरन्यथाऽनशनं भवेत् ॥ तच्चेदनशनं प्रोक्तमभक्ष्यमसमर्पितम् ॥ १५२ ॥ अत एव शिवानंदलहर्यामभियुक्तव-

---

करून नैवेद्य करावा. ( १४५।१४६ ) गुरु, लिंग, जंगम, हे तिन्ही पाद मिळून शास्त्रविधीनें पूजा, प्रसाद, नैवेद्य, वगैरे करून भोजन केलें असतां त्याला भोजन ह्मणतात. गुरु, लिंग जंगम हे तिन्ही नसून शास्त्रप्रमाणें शिवाचें आराधन न करतां भोजन केलें तर तें भोजन नव्हे. कदाचित् तें भोजन केलें तर पापाचें भोजन करितो, असें समजावें. ( १४७ ) " त्रिपादूर्ध्व " या वेदमंत्रामध्यें सांगितलें आहे कीं, गुरु, लिंग, जंगम, यांचे पादोदक धारण करावें असें सांगून या मंत्राच्या शेवटीं पादोदक धारण करून भोजन केलें असतां त्याला अशन ह्मणतात, व पादोदकधारण न करतां भोजन केलें तर त्याला अनशन असें ह्मणतात, असें तेथें सांगितलें आहे. याचें विवरण याखालीं स्पष्ट केलें आहे. ( १४८।१४९।१५० ) प्राणलिंगी वीरशैवानें गुरु, लिंग, जंगम, यांचे पादोदक घेतल्याशिवाय अन्न घेऊं नये. गुरु व जंगम या दोघांपैकीं गुरु जवळ असून जंगम नसला तर गुरूचें पादोदक घेऊन मनानें जंगमाच्या पादोदकाचें अनुसंधान करावें. ( १५१।१५२ ) गुरु नसून जंगम असला तर जंगमाच्या पादोदकामध्यें गुरुपादोदकाचें अनुसंधान करावें. गुरु जंगम दोघे असले तर गुरूचें पादोदक घेऊन भोजन करावें. गुरु, लिंग, जंगम हे तिघे असले तर जंगमाचें पादोदक घेऊन भोजन केलें तर त्याला भोजन ह्मणावें. पादोदक न घेतां भोजन केल्यास तें भोजन नव्हे. कारण शिवाला अर्पण केलेलें अन्न ग्रहण करावें असें शास्त्र आहे. ( १५३ ) परमेश्वरापेक्षां भक्ताला भक्ती-

चनमपि ॥ वृ ॥ मार्गावर्तितपादुका पशुपतेरंगस्य कूर्चायते गण्डूषांबुनिषेचनं पुररिपोर्दिव्याभिषेकायते ॥ किंचिद्भक्षितमांसशेषकवलं दिव्योपहारायते भक्तिः किं न करोत्यहो वनचरो भक्तावतंसायते ॥ इति ॥ १५३ ॥ तस्माल्लिंगे जंगमपादविन्यासादिकमुचिततरमिति सिद्धं ॥ १५४ ॥ ननु ॥ एतादृशपूर्वोक्तवचनानां लिङ्लोट्तव्यप्रत्ययाभावेन विधायकत्वाभावात् ॥ अर्थवादवाक्यानां स्वार्थप्रामाण्याभावाच्च ॥ एभिर्वचनैः कथं तीर्थप्रसादसमर्पणपादविन्यासादिकं कर्तव्यत्वेनांगीकर्तुं शक्यत इति चेदुच्यते ॥ १५५ ॥ औदुंबरो यूपो भवति ॥ उपांशुयाजमन्तरा यजतीत्यादाविव लट्त्वेन भासमानस्याख्यातस्य लेट्त्वपरिणामं कृत्वा विधायकत्वस्यांगीकर्तुमुचितत-

---

मुळें महत्व आलेलें आहे. भक्ति फार थोर आहे. याविषयीं शिवानंदलहरींत प्रमाण आहे. पूर्वीं कन्नप्पा ह्मणून एक पारधी होता तो रस्त्यावरून येतां येतां पायांत घातलेल्या जोड्यानें शिवावरचें निर्माल्य सारीत असे, परंतु परमेश्वरानें त्या जोड्याला दर्भाप्रमाणें पवित्र मानिलें, आणि तोच पारधी तोंडांत धरलेल्या पाण्यानें भक्तिपूर्वक अभिषेक करीत असे, परंतु तें पाणी परमेश्वरानें स्वर्गांतील गंगेच्या पाण्याप्रमाणें मानिलें. तोच पुनः भक्तीनें आपण खाऊन उरलेला मांसाचा तुकडा परमेश्वरास अर्पण करीत असे परंतु परमेश्वरानें तो मांसखंड नवीन नवीन फलाहाराप्रमाणें मानिला, आणि तो पारधी भक्तशिरोमणि असा समजला गेला. सारांश परमेश्वराला भक्ति प्रिय आहे. ( १५४ ) ह्मणून लिंगावर जंगमाचे पाय ठेवणें व त्याच्या पादोदकानें शिवलिंगास अभिषेक करणें अयोग्य ह्मणतां येत नाहीं असें सिद्ध झालें. ( १५५ ) यावर अशी एक शंका येते कीं, पूर्वीं सांगितलेल्या आगमवचनांमध्यें भक्ताचें माहात्म्य दाखविण्याकरितां भक्ताचें पादतीर्थ मी ग्रहण करितों व भक्ताचे पाय मी मस्तकावर ठेऊन घेतों आणि भक्ताच्या प्रसादाचें अन्न नैवेद्य ह्मणून ग्रहण करितों याप्रमाणें परमेश्वरानें ह्मटलें आहे. यावरून आपण मुद्दाम देवाच्या मस्तकावर पाय ठेवावे आणि पाय धुतलेल्या पाण्यानें देवाला अभिषेक करावा असें सिद्ध होत नाहीं. ( १५६ ) परमेश्वरानें सांगितलेलें आगमवचन विधिवाक्य नसून केवळ भक्ताचें माहात्म्य वाढविण्याकरितां आहे अशी शंका आली तर समाधान सांगतात. " औंदुबरो यूपो भवति " या वाक्यामध्यें यज्ञांतील खांब उंबराचा असतो,

रत्वात् ।। नच वेदेषु लेट्त्वेन परिणामाद्यंगीकारेऽप्यागमवचनेषु तथांगीकर्तुमशक्यत्वात्तदभिमतसिद्धिः कथं संगच्छत इति वाच्यं तर्हीतिह्वासपुराणस्मृतिवाक्येष्वप्येतादृशन्यायप्रवृत्तिर्न स्यात् ।। न चेष्टापत्तिः ।। १५६ ।। स्तेयं कृत्वा गुरुदारांश्च गत्वा सुरां पीत्वा ब्रह्महत्यां च कृत्वा ।। भस्मच्छन्नो भस्मशय्याशयानो रुद्राध्यायी मुच्यते सर्वपापैः ।। इति शातातपस्मृतिवचनस्य ।। १५७ ।। गायत्रीजपकोटिस्तु ब्रह्महत्यां व्यपोहति ।। एकादशगुणान्वापि रुद्रानावर्त्य धर्मवित् ।। महापापैरपि स्पृष्टो मुच्यते नात्र

---

एवढेंच सांगितलें आहे. उंबराचा असावा असें विधि सांगितलेला नसूनहि विधिवाक्यच आहे असें समजून जसा उंबराचा स्तंभ करतात आणि " उपांशुयाजमंतरा यजति " या वाक्यांत सांगितलें आहे कीं, हलुच मंत्राचा उच्चार करून हवन करितो. या वाक्यांतही विधि सांगितला नसून जसा विधि मानिला आहे, त्याप्रमाणें आगमवचनही विधिवाक्यच आहे असें मानून आगमांत सांगितल्याप्रमाणें गुरुपादोदक वगैरे ग्रहण करण्यास हरकत नाहीं. आतां तुह्मीं ह्मणाल कीं, " औदुंबरो यूपो भवति " हें वाक्य वेदांतील असल्यामुळें त्यास विधिवाक्य ह्मणतां येईल. परंतु आगमवचनाला विधिवाक्य असें ह्मणतां येत नाहीं. तर पादोदक वगैरे अवश्य ग्रहण करावें असें तुमच्या मताप्रमाणें कसें सिद्ध होतें? असें ह्मणाल तर ऐका. आगमवचन जर विधिवाक्य होत नाहीं तर इतिहास पुराण, स्मृति वगैरे विधिवाक्य होणार नाहींत. तसें न झाल्यास (१५७) स्तेयं कृत्वा इत्यादि लोकप्रसिद्ध वचनें विधिवाक्यें आहेत असें समजून प्रायश्चित्तकांडामध्यें विज्ञानेश्वरानें घेतलीं आहेत आणि धर्मशास्त्राच्या व्याख्यानकर्त्यांनींही आचारकांडामध्यें घेतलीं आहेत. तशीं तीं घेऊन त्या वचनाच्या आधारानें त्या त्या पापांचीं प्रायश्चितें सांगितलीं आहेत तीं येणेंप्रमाणें. चौर्य, गुरुपत्नीगमन, मद्यपान, ब्रह्महत्या वगैरे महापातकें केलीं असतां त्यास प्रायश्चित्त हें आहे कीं, सर्वांगाला भस्मलेप करून भस्माच्या विछान्यावर निजून रुद्राचें आवर्तन करावें ह्मणजे त्या सर्व पापांपासून मनुष्य मुक्त होतो. याप्रमाणें शातातपस्मृतींत प्रायश्चित्त सांगितलें आहे. ( १५८ ) ब्रह्महत्या वगैरे महापाप केलें असतां गायत्रीमंत्राचा कोटि जप करावा ह्मणजे त्या पापापासून मानव मुक्त होतो. रुद्राचीं आकरा आवर्तनें केलीं असतां देखील महापातकापासून मुक्त होतो. याप्रमाणें प्रायश्चित्त दुसऱ्या ग्रंथामध्यें सांगितलें आहे.

संशयः ॥ १५८ ॥ संध्या स्नानं जपो होमो देवतानां च पूजनं ॥ आतिथ्यं वैश्वदेवश्च षट्कर्माणि दिने दिने ॥ १५९ ॥ इत्यादिलोकप्रसिद्धानां प्रायश्चित्तकाण्डे विज्ञानेश्वरमाधवादिधर्मशास्त्रव्याख्यातृभिराचारकाण्डे च परिगृहीतानां वचनानां च स्वोक्तार्थे प्रामाण्यं न स्यात् ॥ तस्मादुदाहरणमात्रेण न्यायस्य प्रवृत्तिरिति न भ्रमितव्यं ॥ नन्वेतेषां स्मृतिपुराणादीनां वेदमूलकत्वाद्वेदवत्प्रामाण्यस्थापनसंभवोऽप्यागमवचनानां तथा प्रामाण्यं न संभवतीति चेन्न ॥ वेदागमयोरेककर्तृकत्वाद्वेदाविरुद्धधर्मप्रतिपादकत्वाच्च निःश्वसितरूपवेदापेक्षया ताल्वोष्ठपुटव्यापारोच्चारितकामिकाद्यागमानामृग्वेद-

---

आणि ( १५९ ) पुराणाच्या वचनानेंच स्नान, संध्या, जप, होम, देवतांची पूजा, अतिथिजनांची सेवा, वैश्वदेव, हीं षट्कर्में प्रतिदिवशीं करावी याप्रमाणें विधान केलें आहे. ( १६० ) इत्यादि लोकप्रसिद्ध वचनें विज्ञानेश्वर, माधव वगैरे धर्मशास्त्राच्या व्याख्यानकारांनीं प्रायश्चित्तकांड व आचारकांड ह्यांमध्यें घेतलीं असल्यामुळें त्यांना स्वोत्कर्षप्रामाण्य संभवणार नाहीं. ह्मणून उदाहरणानेंच न्यायप्रवृत्तिविषयीं संशय बाळगूं नये. इतिहास, पुराणांतील वचनें जशीं विधिवाक्यें होतात त्याप्रमाणें आगमवचनेंहि विधिवाक्यें आहेत असें ह्मणणें बाधक नाहीं. येणेंकरून आगमांत सांगितल्याप्रमाणें लिंगधारण, व भस्मरुद्राक्षधारण, पादोदकग्रहण वगैरे वीरशैवाचार शास्त्रविहित आहेत असें सिद्ध झालें. यानंतर अशी शंका येते कीं, स्मृतिपुराणादिवचनें वेदांच्या अर्थावरून उत्पन्न झालेलीं असतात, ह्मणून वेदांचा आधार असल्यामुळें स्मृतिपुराणादिवचनेंहि वेदांप्रमाणेंच प्रमाण आहेत असें ह्मणणें संभवतें. परंतु आगम वेदांला सोडून स्वतंत्र असल्यामुळें आगमाला वेदांचा आधार नाहीं सबब ते प्रमाण ह्मणतां येणार नाहींत मग आगमांत सांगितलेला सर्व आचार शास्त्रविरुद्ध आहे, व आगमवचनें अप्रमाण आहेत असें कां ह्मणूं नये ? तर याला उत्तर देतात कीं, वेदाचा व आगमाचा कर्ता परमेश्वर असून आणि आगमांत सांगितलेलें आचार वेदाला अनुसरूनच आहेत. वेद परमेश्वराच्या श्वासरूपानें निघालेले आहेत. कामिकादि आगमही परमेश्वरानें आपल्या तोंडानें उच्चारिलेले आहेत याकरितां वेद, व आगम हे दोन्ही बरोबरीचे असून ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद ह्यांमध्यें जसें अंतर नाहीं आणि डावा डोळा व उजवा डोळा हे दोन्ही जसे बरोबरीचे आहेत त्याप्रमाणें वेद व आगम सारख्या योग्यतेचे आहेत. ह्मणून वेद-

यजुर्वेदवद्वामदक्षिणनेत्रवच्च समप्रधानत्वात्प्रामाण्यं सिद्धमेवेति वेदागमवचनैर्विधीयमानं कर्म शिष्टैराचरणीयमिति सर्वं समंजसम् ॥ १६० ॥ इति श्रीषट्स्थलचक्रवर्तिनिरंजनजंगमस्वरूपतोंटदसिद्धेश्वरकारुण्यप्रसादपात्रसुधापुरस्थचन्नबसवेश्वरस्वामिविरचितवीरशैवोत्कर्षप्रदीपिका समाप्ता ॥श्रीः॥ श्रीशिवाभ्यां नमः ॥

---

वचनावरून किंवा आगमवचनावरून केलेलें कर्म सशास्त्र आहे. याकरितां ज्ञानी मनुष्यांनीं वेदोक्त किंवा आगमोक्त कर्म अवश्य करावें. यापासून परमेश्वराचा प्रसाद होऊन चतुर्विध पुरुषार्थ प्राप्त होतात. ह्याप्रमाणें श्रीषट्स्थलचक्रवर्तीनिरंजनजंगमस्वरूपतोंटदसिद्धेश्वरस्वामी ह्यांच्या कारुण्यप्रसादास पात्र झालेल्या सुधापुरांतील चन्नबसवेश्वरस्वामीनीं केलेली वीरशैवोत्कर्षप्रदीपिका संपली.



# स्वातंत्र्यात् स्त्रीणां शिवसंस्कारकर्मण्यनधिकारः

क्रियासारे त्रयोदशोपदेशे—

नाधिकारः स्वतो नार्याः शिवसंस्कारकर्मणि ॥ नियोगाद्भर्तुरस्त्येव यदि भक्ता महेश्वरे ॥ ६७ ॥ तथैव भर्तृहीनायाः पुत्रादेरभ्यनुज्ञया ॥ अधिकारो भवत्येत्र कन्यायाः पितुराज्ञया ॥ ६८ ॥ शूद्राणामन्यजातीनां पतितानां विशेषतः ॥ तथाऽसंस्कारजातीनां नाध्वशुद्धिर्विधीयते ॥ ६९ ॥ तेऽप्यकृत्रिमभावाश्चेच्छिवे परमकारणे ॥ पादोदकप्रदानाद्यैः कुर्यात्पाशविशोधनम् ॥ ७० ॥

---

अर्थ—क्रियासारांतील तेराव्या उपदेशांत सांगितलें आहे कीं,—

(६७) शिवसंस्कारकर्मांत स्त्रियांस स्वतंत्र अधिकार नाहीं. जर एखादी स्त्री शिवभक्त असेल तर (६८) तिला शिवसंस्कारांत पतीच्या आज्ञेनेंच अधिकार पोंचतो; त्याचप्रमाणें विधवेस व अविवाहित मुलीस अनुक्रमें पुत्राच्या व बापाच्या हुकुमानेंच शिवसंस्कारकर्मांत अधिकार प्राप्त होतो. (६९) अन्य जातीय शूद्रांस विशेषतः पापी जनांस व संस्कारविरहित जातींना षडध्वशुद्धि विहित नाहीं. (७०) परशिवाच्या ठिकाणीं जर त्यांची अकृत्रिम भक्ति असेल तर पादोदक वगैरे देऊन त्यांची पाशशुद्धि करावी (मायापाशांतून मुक्त करावें.)

---

॥ श्रीरस्तु ॥

अन्नपूर्णोपनिषदि ३ अध्याये श्लोक २१ पत्र ६६६
शिवःशैवागमस्थानां कालःकालैकवादिनाम् ॥
यत्सर्वशास्त्रसिद्धांतं यत्सर्वहृदयानुगम् ॥ २१५ ॥

---

अर्थ—जें शैवागमांप्रमाणें आचरण करणाऱ्या शिवभक्तांचा शिव आहे, जें कालवादी लोकांचा काल आहे; जें सर्व शास्त्रांचा सिद्धांत आहे; व जें सर्व प्राण्यांच्या हृदयांत वास्तव्य करितें (तें ब्रह्मच तो मुनि झाला) ह्या उपनिषद्वचनावरून शैवागमांचें उपनिषत्कालीन अस्तित्व सिद्ध होत आहे हें सूज्ञ वाचकांच्या सहज लक्षांत येणार आहे.

# विक्रीस तयार.

## श्रीमंत रावसाहेब मल्लप्पा बसप्पा वारद यांच्या वीरशैवलिंगिब्राह्मणधर्मग्रंथमालेंतील मराठी भाषांतरासह असलेल्या संस्कृत ग्रंथांची यादी



| | रु.आ.पै. |
|---|---|
| अनुभवसूत्र | ०- ७-० |
| वीरशैवसदाचारसंग्रह | ०-१२-० |
| सिद्धांतशिखामणि | ३- ०-० |
| व्यासोक्त बसवेश्वरपुराण | ३- ०-० |
| वीरशैवाचारप्रदीपिका | २- ०-० |
| हरिहरतारतम्य | ०- ४ ० |
| विशेषार्थप्रकाशिका | ०- ७-० |
| रामायणसारसंग्रह | ०- ६·० |
| उपयुक्त वेंचे | ०- ७-० |
| विरक्तोत्पत्तिक्रिया लक्षण कानडी | ०- ४-० |
| पारमेश्वरागम | २- ०-० |
| कैवल्यसार | ०-१०-० |
| प्रभुलिंगलीला | ३·१२-० |
| पंचाचार्यपंचसोत्पत्तिप्रकरण | ०- ६-० |
| वीरमाहेश्वरप्रकरण | ०- ८-० |
| दीक्षादिकथन | ०- २-० |
| सूक्ष्मागम | ०-१०-० |
| वीरशैवलिंगिब्राह्मणवंशावलिपट | ०- १-० |
| वीरमाहेश्वराचारसंग्रह, | ५- ४-० |
| शिवपुराणवायवीयसंहिता | ४- ०-० |
| भारतसारसंग्रह | ०- ६-० |
| अनादिवीरशैवसारसंग्रह | ३- ०-० |
| विरक्तोत्पत्तिक्रियालक्षण | ०-११-० |
| संक्षिप्तविवाहविधि | ०- ३-० |
| दशकर्मपद्धति | १- ४·० |
| तात्पर्यसंग्रह | ०- २.६ |

| | रु.आ.पै. |
|---|---|
| शिवचरित्र | ०- ७-० |
| वीरशैवांच्या धर्मस्वतंत्रतीस सरकारांतून मान | ०- २-० |
| स्तोत्रसंग्रह | ०-१०-० |
| रुद्रादिपंचक | ०- २-० |
| बिल्वोपनिषत् | ०- १-० |
| शिवाद्वैतमंजरी ( कानडी ) | ०- ६-० |
| पादोदकविचार | ०- २-० |
| वीरशैवशिवपूजाविधि | ०- ८-० |
| सप्रयोग दत्तविधान ( पुत्रस्वीकारविधिः ) | ०- २-० |
| संक्षिप्तलिंगपूजाविधि | ०- ०-९ |
| वेदांतसारवीरशैव चिंतामणि उत्तर भाग | २- ८-० |
| शैवरत्नाकर | १-२०-० |
| वीरशैवोत्कर्षप्रदीपिका | ०- ४-० |
| सूक्ष्मतंत्र ६ व्या पटलांतील लिंगस्वरूपपूजाफलकथन | ०- १-० |
| वीरशैवदीक्षाविधि | |
| वीरमाहेश्वरदीक्षाविधि | ०- १-० |
| शिष्यवर्गसंप्रदायनिरूपण | ०- १-० |
| ब्राह्मणवर्णन | ०- ०-३ |
| शैववीरशैवभेदाचारनिरूपण ( सूक्ष्मागमपटल ७ ) | ०- ०-९ |
| सूक्ष्मतंत्र पांचव्या पटलांतील गुरुशिष्यलक्षण | ०- १-० |

| | रु.आ.पै. | | रु.आ.पै. |
|---|---|---|---|
| गुरुशिष्यलक्षण | ०- ०-६ | व्यापारसाम्राज्य पूर्वार्ध | १- ०-० |
| वीरशैवखानेसुमारी | ०- १-० | शिवपर अभंग | ०- ७-० |
| वीरशैवमतसंवर्धिनी | ०- २-० | शिवोत्कर्षकीर्तनतरंगिणी | ०-१४-० |
| विवेकचिंतामणि पू० भा० | २- ८-० | वीरशैवलिंगिब्राह्मणधर्मपर अभंग | ०- ०-६ |
| वीरशैवांची स्थिति | ०- ४-० | उपन्यासविद्या ( कानडी ) | ०- ६-० |
| मराठी सिद्धरामेश्वर चरित्र | ०- ७-० | अमरकोश प्रथमकांड | ० १-६ |

ग्रंथ मिळण्याचीं ठिकाणें:—वरील ग्रंथ रा० रा० चनबसप्पा वारद यांचे मुंबई, विजापूर, सोलापूर, कल्बुर्गा,, पूर्णा येथील दुकांनीं व काशीं येथें नरसिंगगिरजी मिलचे दुकानीं विकत मिळतील.

आह्मीं छापिलेल्या धर्मग्रन्थांपैकीं कोणच्याही ग्रन्थाची दुसरी आवृत्ति काढण्याची कोणाची मर्जी असल्यास त्यांस आमची परवानगी आहे कारण धर्मग्रंथांचा जितका प्रसार होईल तितका व्हावा अशी आमची इच्छा आहे.

प्रसिद्धिकर्ता.

छापत असलेले ग्रन्थ.

१. शौचविधि. २. क्रियासार. ३. वेदांतसारवीरशैवचिंतामणि पूर्व भाग. ४. शीलसंपादन.

